या पुस्तकांतील फोटो श्री. बापूराव लेंगडे,
कोल्हापूर यानीं काढलेले आहेत व ब्लॉक
किर्लोस्करवाडी येथें केले आहेत.

# आभार-प्रदर्शन.

हा उसना नवरा खरोखरच उसनवारीनें तयार झाला. अमेरिकन नाटककार लॅरी ई. जॉनसन याचें Her Step-Husband हें नाटक हा याचा मुख्य आधार.

हें नाटक मी लिहिलें म्हणण्यापेक्षां तें मजकडून लिहविलें गेलें. मूळ नाटक वाचल्यापासून त्याला मराठी पेहेराव चढवण्याचा हेतू मनात घोळत होता व तसें करण्याबद्दल आमचे उत्साहमूर्ति शं. वा. कि. यांचा वरचेवर तगादाही होई.

तथापि हा उसना नवरा तयार झाला तो येथील प्रभात वाचनालयाच्या सभासदांच्या जोराच्या आग्रहामुळें. किर्लोस्करवाडीचे जनक श्रीयुत लक्ष्मणरावजी किर्लोस्कर यांच्या वाढदिवसानिमित्त त्यांना नाटक करून दाखवावयाचें होतें व तेवढ्यासाठीं हें नाटक मजकडून लिहून घेऊन त्यांनीं त्याचा प्रयोगही केला. म्हणून प्रभात वाचनालयाच्या सभासद मंडळींचे आभार मी प्रथम मानतो.

यानंतर या उसन्या नवऱ्याला खरा उठाव दिला प्रो. ना. सी. फडके एम. ए. व त्यांचे विद्यार्थी यांनीं. प्रो. अप्पासाहेबांनीं हें नाटक अगत्यपूर्वक वाचून पाहिलें, सुधारणा सुचविल्या, आपल्या कॉलेजच्या संमेलनप्रसंगीं त्याचा प्रयोगही रंगभूमीवर करून दाखवला व आपले व आपल्या विद्यार्थ्यांचे फोटो पुस्तकांत घालावयासाठीं दिले. या सर्व उपकारांबद्दल मी प्रो. फडके व त्यांचे विद्यार्थी यांचे अत्यंत आभार मानतो.

कोल्हापूर येथील श्रीज्ञानेश्वर प्रेस, किर्लोस्करवाडी प्रेस व आर्ट डिपार्टमेंट व कोल्हापूरचे फोटोग्राफर श्री. लेंगडे यांनीं हा उसना नवरा सजवण्याचे कामीं जी मदत केली तिजबद्दल मी त्यांचा ऋणी आहे.

किर्लोस्करवाडी
सप्टेंबर १९३३.

ना. धों. ताम्हनकर

या नाटकाचा जाहीर प्रयोग

ता. २४ सप्टेंबर १९३३ रोजीं पॅलेस थिएटर कोल्हापूर येथें

## राजाराम कॉलेजच्या संमेलनप्रसंगीं

करण्यांत आला,

त्या प्रयोगांत खालील मंडळींनीं कामें केलीं.

१. बाबूराव ... ... प्रो. ना. सी. फडके.
२. अरविंद ... ... श्री. ध. दे. वर्धमाने, बी. ए.
३. मालती ... ... ,, श्री. वि. कुलकर्णी, बी. ए. ऑन.
४. सरला ... ... ,, शं. स. जोशी ( इंटर आर्ट्स )
५. आजोबा ... ... ,, वा. स. श्रीखंडे ( सीनि. बी. ए. )
६. केतकी ... ... ,, वि. ना. मठकर ( इंटर आर्ट्स )
७. शिदू ... ... ,, चिं. द. देशपांडे ( सीनि. बी. ए. )
८. फौजदार ... .. ,, त्र्यं. रा. कुलकर्णी ( एफ. वाय. )
९. लखोबा ... ... ,, ना. व. परांडेकर ( इंटर आर्ट्स )

---

# उसना नवरा.

## अंक १ ला.

[ **स्थळः**—मालतीचें घर. शिदू दिवाणखाना सजवीत आहे, व टेबलें, खुर्च्या वगैरे झाडीत आहे. सरला एक टोपली घेऊन दारांत येते. ]

**सरला**—तूं रे कोण? मालतीताईचा नवीन गडी का तूं?

**शिदू**—व्हय बाईसाब.

**सरला**—मालतीताई कुठं आहे?

**शिदू**—त्या आंत गेल्या हैती. त्यास्नी जाऊन सांगू व्हय आपुन आलां म्हून? कोन आलंय म्हून सांगू?

**सरला**—मी सरलाताई. तिची मैत्रीण. कांहीं नको सांगायला.

**शिदू**—व्हय, व्हय. त्येस्नी हाय दखल तुम्ही येनार म्हून.

**सरला**—हे घे मी आणलेले जिन्नस. आपणच लावूंया ते. ( सरला टोपलींतून पडदे काढते. एक आरसा काढून ) नीट जपून ठेव त्या टेबलावर. पाडशील बिडशील. आणि हें घे चांदीचं तबक. कुठं बरं ठेवूंया हें? ठेव तिथंच कुठं तरी. आणि ते पडदे घे. लावूं या दारांना, आणि तो ग्रामोफोन आण, अन असा खिडकीजवळ ठेव.

**शिदू**—व्हय बाईसाब. ( फोनोग्राफ खिडकीजवळच्या स्टूलावर ठेवतो. )

**सरला**—अरविंदराव आहेत कां रे घरांत?

**शिदू**—म्या पाह्यलं न्हाइ त्येस्नी. ( खुर्चीवर उभी राहून पडदे लावीत असलेल्या सरलेला एक एक पडदा देतो. दुसऱ्या बाजूनें मालती येते. )

**मालती**–काय तरी बाई तूं सरलाताई ! केव्हां आलीस ? आणि हाक मारायची नाहीं कां मला ? ( शिदूकडे पाहात ) आणि–काय बरं तुझं नांव ? लक्षांतच राहात नाहीं मेलं.

**शिदू**–शिदू बाईसाब.

**मालती**–बाळ निजला कां रे ?

**शिदू**–मला वाटतंया तसं. रडं ऐकूं येत न्हाइ.

**मालती**–एवढ्यावरून तो निजला आहे असं समजूं नकोस तूं. अंथरुण ठेवलं असेल भिजवून. काय बाई तरी मूल चमत्कारिक ? तशा किचमिचकाल्यांत खुशाल खिदळत असतो गुलाम. पाहून येतोस कां रे जरा ?

**शिदू**–व्हय बाईसाब. ( मालती त्याच्या हातांतून पडदे घेते, व तो जातो. )

**सरला**–चलाख छोकरा दिसतोय नाहीं ? बरा मिळाला बाई तुला.

**मालती**–आतां तरी दिसतोय तसा. सकाळीं आल्यापासून त्यानं किती बर काम केलं. आणि बाळाला पण भूलच घातली आहे जशी कांहीं. हट्टी पोरटा कुणापशीं जायचा नाहीं. पण याच्यापाशीं उड्या घेत जातो. त्याला ओचकारतो काय ! चिमटे काय घेतो ! मौजच मौज करतो.

**सरला**–मग त्याला कायमचाच ठेवून घे मालती.

**मालती**–अग पण तें व्हायचं कसं ? इकडच्या पगार बेताचा. तीस तारीख जेमतेम गांठायची. नोकर चाकर ठेवून कसं परवडायचं ? बरं पण आज अरविंदांचं येणं कसं झालं नाहीं अजून ? रोज तर याच्या आधीं येतात. तुझे सुधाकर तरी केव्हां येणार आहेत ?

**सरला**–तुला सांगायचंच विसरलें मी. आजच्या बेताला सुधाकर येत नाहींत बरं का.

**मालती**–ते ग कां ? भारीच बाई यांचं हें ?

**सरला**–अग त्यांना आज तांतडीचा हुकूम आला आहे ह्मणे मुंबईला जायचा. ते ऑफीसांतून परभारेंच गेले चारच्या गाडीनं.

**मालती**–अरविंदांना चुकल्या चुकल्यासारखं होईल आतां. सुधाकर असले ह्मणजे दोघांची मैफल चांगली रंगते. ( चांदीचें तबक पाहून. ) किती छानदार आहे हें तबक. केव्हां घेतलंस हें ?

**सरला**–घेतें कुठली ? आमच्या लग्नांतला आहेर आहे तो.

**मालती**–आह्मांला कुठला आला आहे बाई आहेर ! प्रीतिविवाहांत कोणता तोटा असेल तर तो हाच. कांहीं आहेर मिळत नाहीं.

**सरला**–ह्मणजे तुमचा प्रीतिविवाह मुलखावेगळाच दिसतो. हं ! चोरून मारून केला आहे वाटतं ?

**मालती**–हं.

**सरला**–चांगलीच रोमांटिक आहांत कीं !

**मालती**–कसलं रोमांटिक आणि काय ? नुसता गडबडगुंडा झाला.

**सरला**–तो ग कां ?

**मालती**–आमचे आजोबा आहेत ना ?

**सरला**–आजोबा ? आज येणार आहेत ते ?

**मालती**–हो. मी कीं नाहीं त्यांच्याजवळ सातारला होतें. तिथंच मी शाळेला जायची. त्या वेळीं माझी अरविंदांची ओळख झाली आणि प्रेमही जमलं आमचं. अरविंदांनीं आजोबांच्याकडे मागणी घातली. पण आजोबांनीं काय उत्तर दिलं आहे कां ठाऊक ? अगदीं दोनच शब्द -- ' साफ नाहीं. '

**सरला**–ह्मणून तुह्मीं चोरून लग्न केलं वाटतं ?

**मालती**–( मानेनें हुकार देते. ) तेव्हांपासून कीं नाहीं, आजोबांचा राग झाला आहे आमच्यावर. त्यांच्या मनांतून साताऱ्याच्या रंगराव साव-

कारांना द्यायचं होतं मला. लक्षाधीश आहे तो रंगराव. पण त्याची आणि माझी ओळख देखील नाहीं. मग काय ह्मणून ग व्हावं मी कबूल ? आणि ध्यानच आहे नुसतं तें. इश्श !

**सरला**—मग तुझ्या आजोबांनीं अरविंदांना पाहिलं नसेल अजून ?

**मालती**—कुठुन पहाणार ? लग्न झाल्यावर अरविंदानीं पत्र पाठवून क्षमा सुद्धां मागितली आणि आशिर्वाद देण्याबद्दल विनंती केली. पण तो कोपिष्ठ जमदग्नी जास्तच चिडला; आणि त्यानं अरविंदांना नाहीं नाहीं तें लिहिलं. अरविंदांना इतकी चीड आली कीं त्यानीं तेव्हांपासून एक बोटभर चिठी लिहिली नाहीं आजोबांना. मी अशी निघून आल्यावर आजोबांनीं माझी एक दूरची मावस बहीण केतकी ह्मणून आहे, तिला आणून ठेवलं आपल्यापाशीं; आणि तिला ते आपली सारी जिंदगी देणार आहेत. ती केतकीदेखील येणार आहे आज आजोबांच्या बरोबर.

**सरला**—मग आजच बरा ग फुटला तुझ्या आजोबांना इकडे यायला प्रेमाचा पान्हा ?

**मालती**—तें असं झालं बघ सरलाताई. आमचा बाळ झाला कीं नाहीं, तेव्हां मी येथूनच लिहिलं त्यांना. मला वाटत होतं त्यांचं कांहीं उत्तर यायचं नाहीं म्हणून. पण त्यांच्याकडून पोष्टांतून एक पार्सल आलं बारशाच्या दिवशीं. आणि त्यांत कीं नाहीं, एक तोळ्याची बाळासाठीं चेन धाडली होती त्यांनीं. कुठं आहे बरं ती ? (थोडा वेळ आठवून पाहते.) शिदू ! अरे शिदू ! (शिदू येतो.)

**शिदू**—जी ! आलों न्हव कां !

**मालती**—बाळाला झोंप लागली कां रे ?

**शिदू**—त्ये कसं सांगू ? बाळासाब कांइ मुठी चोखित न्हेती अन् त्यांचं डोळबी मिटल्यागत दिसत्याती. पर त्येस्नी झोप लागलीया कां त्ये जागं हैती त्ये मी कसं सांगू ?

**मालती**–मग लागली आहे त्याला झोंप. आतां तूं असं कर शिदू, माजघरांत फडताळांतल्या वरच्या कप्यांत एक वाटोळी डबी आहे ती घेऊन ये. त्यांत बाळाची आहे चेन. ती मला काढून ठेविली पाहिजे आजोबांना दिसायजोगी.

**शिदू**–व्हय बाईसाब. (जातो.)

**मालती**–पाहीलंस सरलाताई, दिवाणखाना कसा सुरेख दिसायला लागला आहे तो !

**सरला**–थांब. एवढा पडदा कमानीवर बांधतें आणि बघतें.

**मालती**–मला तूं हंसत असशील मनांतून सरलाताई. ही आरास सगळी तुझी, आणि बडेजाव दाखविणार मी. पण माझं बिंग फुटायचं नाहीं ना ग ?

**सरला**–मुळींच भिऊं नको मालती.

**मालती**–आजचा हा प्रसंग मोठा आणीबाणीचा आहे हं ! अरविंद आणि मी गरीब माणसं आहोंत. पहिल्या पहिल्यांदा आम्ही नुसती भाकरी खाऊन रहात होतों. आम्हांला नोकरी लौकर मिळाली नाहीं आणि जवळची पुंजी तर संपली. एक एक रात्रीं तर आम्ही नुसतं पाणी पिऊन झोंपीं गेलों आहों. तेव्हांची आठवण झाली म्हणजे अजून जीव कळवळतो ग !

**सरला**–अग ! पण प्रेमानं भरलं होतं ना पोट तुमचं ? पण मी म्हणतें मागचं कशाला काढती आहेस उकरून ? आतां बसलं आहे ना बस्तान ! मालती ! तुझे आजोबा झाले तरी मला मोठे पाषाण हृदयीच दिसतात. इतकं हें हाल होतं तर नव्हती कां त्यांनीं मदत करायची ?

**मालती**–अग पण त्यांना ठाऊक कुठं होतं ? हीच तर जंमत आहे मुळीं. त्यांना वाटत होतं आम्ही मोठे श्रीमंत आहोंत म्हणून. आणि अजून सुद्धां तीच कल्पना आहे त्यांची.

**सरला**–( पडदे टांगून झाल्यावर खुर्च्या सरळ लावीत ) असं कशा-वरून वाटतंय त्यांना !

**मालती**–तुला रंगराव सावकाराबद्दल सांगितलं ना? त्यांचं माझ्या एका शाळेंतील मैत्रीणीशीं लग्न झालं. तिचं नांव लिली. मोठी नटवी आणि दिमाखखोर मुलगी बर कां ती. मला पत्रं लिहायची आणि आपला वाडा केवढा मोठा आहे, आपला नवा बंगला कसा छान आहे, आपल्या घरीं किती गडी माणसं आहेत, हें भारूड असायचं त्या पत्रांत. मी कांहीं कमी नाहीं. मी तिला लिहायची आम्हीही तुमच्यापेक्षां कमी नाहीं म्हणून.

**सरला**–( हंसून ) नाहींच नाहीं तरी. बरं पण भांडी टेबलीं आहेस कां काढून ?

**मालती**–हो. ( पडद्यांत बोट दाखवून ) तीं बघ, आणि हें बघ कीं नाहीं सरलाताई, मी तिला लिहिलं आमचा बंगला आहे, त्याच्या भोंवतीं सुरेख बाग आहे, आणि किती किती आहे. माझीं तीं पत्रं जर तूं वाचलीं असतीस, तर तूं मला म्हटलं असतंस कीं मी केवढी मोठी कादंबरीकार आहे म्हणून. इकडे तर उष्टींखरकटीं करण्यांत आणि धुण्यापाण्यांत माझा जीव मेटाकुटीला आला आहे, आणि लिलीच्या पत्रांत मात्र मी नोकर चाकर आणि घोडागाडीच्या बाता मारायची ! गंमतच नाहीं कां ही ?

**सरला**–तुझं एकएक बघावं तें नवलच.

**मालती**–खरी जंमत ती पुढं आहे. लिलीनं एक लिहिलं तर मी दोन लिहायची. मी पाच हजारांचा बंगला बांधल्याचं लिहिलं तेव्हां तिनं सात हजारांची मोटार घेतल्याचं मला कळविलं. मग मी लिहिलं कीं मला एक गोजिरवाणं बाळ झालं आहे म्हणून. त्यावर तिचं काय उत्तर आलं, आहे कां ठाऊक ? ‘ मला आगळीं जावळीं दोन मुलं झालीं आहेत ’ असं मला लिहीलं तिनं.

**सरला**—चांगलीच खप्पी दिसती आहे तुझी ही लिली !

**मालती**—मी सात खप्पी आहे सरलाताई. मी तिला पुन्हां लिहीलं कीं आम्ही आमच्या बंगल्यांत विजेची रोषनाई केली आहे आणि स्वयंपाकालासुद्धां आह्मी आचारी ठेवला आहे ह्मणून. कुठला आला आहे आचारी ! श्रीमंत लोकांच्यासुद्धां बायका स्वयंपाक करतात. आहे माहीत मला.

**सरला**—मग बसली असेल गप ?

**मालती**—अग पण तिनं केलं काय, माझी सगळी पत्र तिनं आजोबांना दाखविलीं; आणि आजोबांना तें सारं खरंही वाटलं. आतां आजोबा येणार आणि आचारी तर नाहीं !

**सरला**—मग ?

**मालती**—मग काय ? आलें आहे सांगून मी त्या हॉटेलवाल्याकडे दोन दिवसापुरता आम्हांला एक आचारी धाडून द्या ह्मणून. ( दुसऱ्या बाज़नें अरविंद येतो. तो विचारांत गढून गेलेला दिसतो. त्याला सरला दिसत नाहीं. )

**सरला**—या अरविंद. उशीर केलात आज ?

**अरविंद**—[ चमकून वर पाहून ] कोण ? सरलाताई ? तुह्मी ! मी विचाराच्या तंद्रींत तुमच्या घरीं आलो कीं !

**सरला**—[ हंसून ] नाहीं हं, तुह्मी तुमच्या घरीं आहांत.

**अर०**—ह्मणजे ? [ इकडे तिकडे पाहून. ] घर माझं दिसतंय, पण इथली आरास माझी नाहीं दिसत. [ मालतीकडे पाहून ] तरी पण माझी गृहलक्ष्मी आहेच इथं ! अरे, आहे काय ही भुताटकी ?

**मालती**—**गडे** इतका वेळ कुठं असायचं होतं ?

**अर०**—वाटेंत **जरा** क़ाम लागलं.

**मालती**—लागूं दे लागलं तर. तें पुराण ऐकायला वेळ नाहीं आतां.

**अर०**–( घड्याळाकडे पाहून ) अग पण सातच वाजताहेत अजून.

**मालती**–तरी पण झटपट केली पाहिजे तुह्मांला. शिदूनं कपडे काढून ठेविले आहेत तुमचे. बदलून या बरं लौकर.

**अर०**–शिदूनं ? हा शिदू कोण ?

**मालती**–गडी आहे तो.

**अर०**–अग पण कुणाचा ?

**मालती**–आतां वेळ नाहीं मला सगळं सांगत बसायला. मी सांगतें तेवढं करायचं. करायचं ना गडे ?

**अर०**–बंदा सेवला हजर आहे राणीसरकार.

**मालती**–[ पोलक्याच्या खिशांतून तार काढून त्याच्या हातीं देते. ] हें वाचा.

**अर०**–[ वाचतो ] Coming there at 8 P. M. Ketaki accompanis. Will stop with you over-night. Proceeding to Baroda tomorrow Morning. Baba Kale.
म्हणजे ! तुझे आजोबा ?

**मालती**–हो.

**अर०**–आणि ही केतकी कोण ?

**मालती**–ती माझी मावस बहीण. आजोबांच्या जवळ असते. आतां जरा जलदी करायची बरं का.

**अर०**–बोल, मी काय करूं ?

**मालती**–स्टेशनवर जाऊन त्यांना घेऊन यायचं.

**अर०**–पण खुळे, स्टेशनवर कशाला जायचं ? मरायला ?

**मालती**–म्हणजे काय ?

**अर०**–म्हणजे असं, तुझे आजोबा गाडीनंच येणार कशावरून ?

त्यांनीं कांहीं तसं लिहीलेलं नाहीं. ते काय मोटारींतून येतात, कीं विमानांतून येतात, आम्ही कसं समजायचं ?

**मालती**–होय कीं. मग काय करायचं बाई ?

**अर०**–कांहीं करायचं नाहीं. त्यांना आमचा पत्ता माहीत आहे. येतील आपोआप.

**मालती**–तेंही खरच म्हणा. बरं. आतां कपडे बदला.

**अर०**–मालती ! तुझं मन दुखवावं अशी माझी मुळींच इच्छा नाहीं. पण खर सांगू तुला ? इथं राहून तुझ्या आजोबांची भेट घेणं आपल्याला कांहीं जुळायचं नाहीं.

**मालती**–अरविंद ! मग काय, त्यांना आला तसे परत जा म्हणून सांगू मी ?

**अर०**–मुळींच नको. आजोबा तुझे आहेत आणि त्यांना तूं हवी आहेस. तुझ्या घरांत ते वाटेल तितका वेळ राहिले तरी माझी मुळींच हरकत नाहीं. ते इथं असेपर्यंत मी माझी सोय कुठंही करीन. त्यांचं माझं एक ठिकाणीं जमणं शक्य नाहीं.

**मालती**–अरविंद, अरविंद ! !

**अर०**–मी खोटं नाहीं सांगत तुला मालती. तुझे आजोबा आणि मी आमोरा समोर आल्यावर बोलाचाली ही होणारच. मूग गिळून स्वस्थ बसणं माझ्या हातून कालत्रयीं होणार नाहीं. सरलाताई, तुम्हांला माहीत नाहीं, पण या आजोबांनीं आमच्या लग्नाच्या वेळीं सपशेल मोडता घातला होता.

**सरला**–कळलंय मला. मालतीनं सारं सांगीतलंय.

**अर०**–मी शक्य तितकं नमतं घेतलं. आजेबाचीं पत्रं लिहीलीं, चार दिवस आमच्याकडे येऊन राहण्याबद्दल विनंती केली, पण त्यांनीं काय उत्तर दिलं माहीत आहे ? 'माणूसकीला मुकलेला' म्हणून पत्रांत अपमान केला माझा.

**मालती**–हं, पण त्यानीं मागाहून बाळाच्या बारशाकरितां चेन पाठविली ना !

**अर०**–मागाहून चेन पाठविली म्हणून प्रथम केलेली जखम भरून येते थोडीच ? लक्षांत घ्या सरलाताई, वाटलं तर मी भेटीला येतों म्हणून विचारलं, तर म्हातारा लिहीतो काय ?—माझं घर फक्त सभ्य माणसाकरितां आहे. हा अपमान विसरतां येणं शक्य आहे काय ? त्या वेळीं असा संताप आला मला, कीं म्हाताऱ्याला धरावं आणि नदींत नेऊन बुडवावा. [ सरला हंसते ] हंसता काय ?

**सरला**–माफ करा हं अरविंद. तुमची ही भानगड ऐकून मला हसूं आवरेनाच.

**अर०**–जगानं हसण्याजोगंच झालं आहे तें.

**मालती**–पण, अरविंद ! आपण इथ राहात नाहीं तर जाणार तरी कुठं ?

**अर०**–कुठंही. माझी नको तुला काळजी. एक दोन दिवस मी मजेत घालवीन.

**मालती**–पण मी आजोबांना काय सांगूं ? खरं सांगितलं तर त्यांच्या मनाला लागेल. बरं खोटं सांगितलं तर तुम्हांला आवडेल कां ?

**अर०**–पण खोटं सांगायची जरूर काय ? खरं तेंच सांग. तूं सांग मी गावाला गेलों आहे, आणि तें खरंही आहे.

**मालती**–हें ठीक आहे म्हणा. [ स्वतःशीं विचारमग्न होते. ] नाहीं तरी मी लिलीच्या पत्रांत लिहीलं होतं कीं तुम्ही चांगले उंच आणि धष्ट पुष्ट आहांत म्हणून, आणि तुमच्या मिशा रँगलर परांजप्यांच्या सारख्या आहेत.

**अर०**–[ मोठ्यानें हसून ] भले बहाद्दर !

**मालती**–बरं पण अरविंद, मग आटोपतां ना लौकर ? [ अरविंद जाऊं लागतो.] थांबा हं. आज तुमची खोली मी पाहुण्याकरतां मोकळी करून ठेविली आहे. आणि माझी खोलीही रिकामी करून ठेविली आहे मी.

**अर०**–न्हाणीघर तरी आहे कां जागच्या जागीं ?

**मालती**–पण न्हाणीघर हवं आहे कशाला तुम्हांला ? आतां आंघोळ करीत बसायला नाहीं वेळ. [दरवाज्यांतील घंटा वाजते. ] अगबाई ! आलेच वाटतं आजोबा.

**अर०**–[रिस्ट वॉच पाहून] शक्य नाहीं. सव्वासात वाजले आहेत नुकते.

**मालती**–पण आटपायचं गडे लौकर. आणि हें बघितलं कां ? आज टॉवेल घ्यायचा नाहीं अंग पुसायला. पाहुण्यांच्याकरतां धुऊन ठेवला आहे मी. तो जुना पंचा आहे तिथं मागील दारीं.

**अर०**–आज्ञा सरकार. [ हंसत आंत जातो. ]

**मालती**–मला वाटतं आचारी आला आहे. बघून येतं हं.

**सरला**–तूं नको जाऊस दारांत. शिदूला पाठीव.

**मालती**–अग होय कीं. शिदू, अरे शिदू. ( शिदू येतो. )

**शिदू**–जी ! आलो न्हय कां !

**मालती**–हें पहा, दरवाज्यांत कोण आलंय पहा बरं. ( जातो ) सरलाताई ! आतां काय बोलायचं गं त्या आचाऱ्याबरोबर ?

**सरला**–तें तुझं तूं घे पाहून. मी जरा स्वैपाकघरांतलं पहातें ! ( जाते; शिदू प्रवेश करतो )

**मालती**–कोण आहे ?

**शिदू**–एक बाप्या आलाया. तो म्हनतुया ' मी सवळकरी हाय '. पर हॅट ! मला न्हाइ वाटत तसं ! रामुशाचानी दिसतुया.

**मालती–पुरे** तुझं. घेऊन ये तूं त्याला आंत ( शिदू जातो. मालती मालकिणीच्या रुबाबांत खुर्चीवर बसते. शिदू आचाऱ्यास घेऊन येतो. ) हॉटेलांतून आलां तुम्ही ?

**आचारी**–होय बाईसाहेब. 'हॉटेलच्या मॅनेजरनीं ही चिठ्ठी दिली आहे. [ मूल रडलेलें ऐकूं येतें ]

**मालती**–बाळ उठला वाटतं ? बघ जा.

**आचारी**–तान्हं बाळ आहे इथं ? वा ! मला मुलं फार आवडतात. परवां मी एके ठिकाणी कामाला होतों तिथं मुलं नव्हतीं तर मला तें घर म्हणजे मशीदीसारखं भकास वाटायचं. अहो मुलं म्हणजे काय महाराज ! मजा आहे मजा ! सूर्याची किरणं जशी कांहीं ! बाईसाहेब ! आपल्याला किती किरणं आहेत ?

**मालती**–किरणं ? इश्श ! एक बाळ आहे !

**आचारी**–फक्कड ! एका बंगल्यांत एक किरण, मोठा वाडा असला तर तीन किंवा चार सुद्धां चालतील. मागं एका घरीं मी होतों तिथं सहा मुलं होतीं. आणि त्या सगळयांची व्यवस्था मी एकटा करायचा. तिथल्या मालकीणबाई म्हणायच्या कीं ' लखोबा ! तूं करतोस तरी कसं इतकं ? प्रत्यक्ष आईच्या हातून सुद्धां इतकं नाहीं व्हायचं ' तेव्हां मी म्हणायचा कीं ' बाईसाहेब, त्याला खुबी लागते खुबी. '

**मालती**–बरं पण—स्वयंपाक पाण्याचा चांगला सराव आहे ना तुम्हांला ?

**आचारी**–सराव ? बाईसाहेब ! काळयाचे पांढरे व्हायची वेळ आली पाणी भरतांना आणि चूल फुंकतांना.

**मालती**–यापूर्वी तुम्ही कुणाकडे कामाला होतां ?

**आचारी**–कुठं म्हणून सांगू ? शेकडों थोरामोठ्यांचीं कामं केलीं आहेत मी. पण सगळीकडे म्हारवडा बाईसाहेब. कामाचं चीजच नाहीं. आतां आपण ठरवलं आहे, तुमच्या सारखं एखादं छान माणूस बघून तिथंच जन्म काढायचा.

**मालती**–पण आम्हाला सारा दोन दिवसांपुरता माणूस हवा आहे.

**आचारी**–दोनच दिवस ? तरी कांहीं हरकत नाहीं, आपलं काय ?

**मालती**–बरं पण- तुमच्या रोजगाराचं काय ?

**आचारी**–तें मी तुमच्या मर्जीवर सोपवितों बाईसाहेब. थोरा मोठ्यांचं काम करायचं एवढं आपल्याला माहितो.

**मालती**- ( उठून ) थांबा हं. बसा इथं. मी जरा आंत जाऊन येते. ( जाते; आचारी उठतो व दिवाणखान्यांत इकडे तिकडे हिंडतो. हलकेंच कपाटाचें कुलूप हालवतो. मागून खिडकी उघडून कड्या कोयंडे पाहतो. टेबलाचा ड्रॉवर उघडूं लागतो. हें सर्व करीत असतांना त्याची नजर मालतीच्या वाटेकडे असते. शिदू प्रवेश करतो. )

**शिदू**–ए ! [ आचारी दचकून मागें पहातो ] काय करतुयास तथं ? तुला हत बसाया सांगीतलं व्हत, नव्ह कां ?

**आचारी**–होय पण बघत होतों एकदा. आपल्याला इथ काम करायचं तेव्हां म्हटलं–

**शिदू**–अरे पर तुझी नेमनूक झाली न्हाइ अजून. तुझं हे असं चाळ बघितलं तर मला न्हाइ वाटत इथं तुला काम मिळल असं. सांगतोच जाऊन बाईसाहेबांना.

**आचारी**–अरे असं नको करूं. [ शिदूचा हात घट्ट धरतो, शिदू 'हात सोड, हात सोड' म्हणून ओरडतो. हात सोडून ] हे पहा ए भाऊ, मला कामाची फारच गरज आहे रे. [ मालती व सरला स्वयंपाकघरांतून येतात. ]

**मालती**–काय चाललंय रे शिदू ?

**शिदू**–हें बघा कीं नई बाईसाब, ह्ये तुमचं सवळेकरी बुवा तुमच्या ह्या टेबलाचा ड्रायवर उघडाय लागल व्हत––

**आचारी**–खोटं बोलतोय हा पोरगा बाईसाहेब. आपण काम करीत नाहीं तें छपवायला दुसऱ्याच्या कागाळ्या नकोत का करायला ?

**सरला**–मालती ! या गृहस्थांना तूं रजा दे कशी.

**आचारी**–बाईसाहेब ! अशा निर्दय नका होऊं. मला कुठं तरी काम मिळवायची फार जरूर आहे हो .

**मालती**–हें पहा, आम्हांला जरूर असती तर ठेवलं असतं तुम्हांला. पण माझा आतां बेत फिरला, आणि आचारी ठेवायचा नाहीं असं ठरव-लंय मी. या हं.

**आचारी**–बाईसाहेब...

**सरला**–' निघून जा ' म्हटलं ना ?

**आचारी**–तुम्हीं कोण सांगणार ?

**सरला**–मी कोण सांगणार ? [ रागानें पाहते. ]

**शिदू**–हें बघ ! ग्याट जवळच हाय. जातुयास का हाक मारूं हवालदारास्नी ?

**आचारी**–जातों जातों. कोण सुजलाय असल्या म्हारकींत काम करायला ? [ जातो. शिदु त्याच्या मागोमाग दरवाजापर्यंत जातो. ]

**मालती**–मला बाई भितीच वाटली त्या माणसाची. काय त्याचा तो चेहरा. राक्षसच जसा कांहीं. (शिदू परत येतो.) पण काय रे शिदू ? त्यानं तुला ' भाऊ ' रे काय म्हणून म्हटलं ?

**शिदू**–असल्या गळकापू लोकांची ती रीतच हाय बाईसाब. त्ये कुनाला बाप म्हनत्याल, कुनाला भाऊ म्हनत्याल, कुनाला काका म्हनत्याल, आन कवा गळा कापत्याल त्येचा पत्यावी न्हाई लागायचा ! मला या जगांत भाऊ न्हाय, अन् मी बी कुनाचा भाऊ न्हाय ! माझं सगळं भाऊ, भन, आई, बाप, काका, मामाबी तुमीच बाईसाब !

**सरला**–(हंसून) ही मालती तुझा मामा हं ? मालती आतां आमचे सुधाकर जर इथें असते तर या शिदूनं हसवून हसवून पुरेवाट केली असती त्यांची.

**मालती**–तो माणूस कोणी लुच्चा लफंगा तर नसेल ना ग ?

**सरला**–लफंगाच आहे तो कांहीं झालं तरी. माणसाची जात झाकून कां राहते ! मला त्याची एकंदर चर्या नाहीं आवडली.

**मालती**–बरं पण आतां कसं गं करायचं सरलाताई ? आचारी नसला तर फजीतीच आहे बाई.

**सरला**–कसली आली आहे फजीती ? द्यायची कांहीं तरी थाप. सांगायचं दवाखान्यांत त्याचं ऑपरेशन केलं आहे म्हणून.

**मालती**–अग पण थापा देऊं तरी कसल्या कसल्या ? मोटार रिपेरीला टाकली आहे, आणि वाज्याची पेटी शेजारच्या घरीं मागून नेली आहे म्हणून सांगायचं ठवलंच होतं मी. त्यांत आणिक आचाऱ्याचं ऑपरेशन घुसडूं म्हणतेस ?

**सरला**–अडचणच आहे एकंदरींत. सुधाकर असते तर त्यांनीं केली असती कांहीं तरी तजवीज. वेळींप्रसंगीं ते देखील तेवढ्या पुरते आचारी बनले असते.

**मालती**–( कांहीं वेळ सचिंत बसून व एकदम आठवल्यासारखें करून ) अरविंद !

**सरला**–कां, ग ?

**मालती**–सुधाकरांनीं जर तजवीज केली असती, तर अरविंद नाहींत कां करणार ?

**सरला**–त्यांना आचारी व्हायला सांगणार तूं ?

**मालती**–बघूं या तरी विचारून.

**सरला**–पण कबूल करतील कां ते ?

**मालती**–मी म्हटल्यावर वाटेल तें कबूल करतील. प्रथम घेतील थोडे आढेवेढे, पण—( हंसते )

**सरला**–आलं लक्षांत. मग होईल बाई काम.

**मालती**– होईल म्हणजे, व्हायलाच हवं आहे. ( नुसता सद्रा घालून अरविंद येतो. )

**अर०**–एक जिन्नस जाग्यावर असेल तर शपथ. अग माझा कोट, छत्री, बॅग, आहे तरी कुठं आज ?

**मालती**–पण हवा आहे कशाला इतका जामानिमा ? आपल्याला बाहेर जायची गरजच नाहीं मुळीं.

**अर०**–( हर्षानें ) काय पुन्हा तार आली आजोबा येत नाहींत ह्मणून?

**मालती**–अंहं. ते तर येतातच, पण तुम्हांला घरांत ठेवून घ्यायची एक गमतीदार युक्ती काढली आहे मी. सांगतें हं. बसायचं जरा इथं. ( त्याला खुर्चीवर बसविते. आपण त्याच्या खांद्यावर हात ठेवून शेजारी बसते, व त्याचा हात आपल्या हातांत घेते ) खरं सांगायचं हं. मीं आपल्याला आवडले कां ?

**अर०**–आवडते कां ? काय विचारतेस हें ?

**मालती**–खरं ?

**अर०**–कशाची शपथ घेऊन सांगूं ?

**मालती**–मग माझं एक ऐकायचं गडे.

**अर०**–तुझा लडिवाळपणा असा उताला आला कीं त्यापुढें तूं कसला तरी कोलदांडा घालणार हें ठरलेलंच आहे.

**मालती**–( रुसव्यानें ) मग मी बोलतच नाहीं मुळीं !

**अर०**–ओ हो ! राग तर हुकमी आहे. बरं पण बोल काय करूं मी ?

**मालती**–आज आपण आचारी व्हायचं गडे.

**अर०**–काय ? आचारी ? स्वयंपाक्या ? मालती, काय सांगतेस हें ? ज्याचं तोंड सुद्धां पहायला नको म्हणून मी दुसऱ्याकड वार लावायला तयार झालों त्याच म्हाताऱ्यापुढं आचारी ह्मणून उभं राहायचं ? मुळींच



अरविंद-- हं सांग ना काय तें ?  (अंक १ ला)

व्हायचं नाहीं आपल्या हातून तें. मला झाला तरी कांहीं मान आहेच कीं नाहीं ?

**मालती**–पण गडे अरविंदांना आजोबांच्यापुढें उभं राहायाला मी कुठं सांगतें ?

**अर०**–मग कुणाला ?

**मालती**–आचाऱ्याला. आचाऱ्याच्या सोंगाला. हें काय बरं अर-विंद ? एवढंसुद्धां माझं ऐकायचं नाहीं ? तुझ्यावर माझं प्रेम आहे, तुझ्यासाठीं जीवसुद्धां मी गहाण ठेवीन, म्हणून आजपर्यंत बाता मारल्यात. पण मीच खुळी. फसलें ग बाई, अगदीं फसलें. ( डोळयांस रुमाल लावते. )

**अर०**–असं काय बरं ? मालती ! मी ' नाहीं ' कुठं म्हटलं ? पण आचाऱ्याचं सोंग मला कसं घेतां येणार ? थोरामोठ्याकडला आचारी कसा असतो तो मी बघीतलासुद्धां नाहीं.

**मालती**–आणि आजोबांनीं तरी कुठं पाहिला आहे ? कोणा वाटेल त्याला ते आचारी म्हणतील. मग ? करणार ना माझ्या मनासारखं–खरं सांगायचं. करणार ना ?

**अर०**–हं. करायलाच पाहिजे.

**मालती**–खरं ना पण हें ?

**अर०**–खरं, खरं, खरं. शपथ घेतों वाटेल तर ह्मणशील त्याची.

**मालती**–( हर्षानें ) अरविंद ! तुम्ही किती किती चांगले आहांत ! पाहिलंस सरलाताई ?

**सरला**—( हसते ).

**अर०**–तुम्ही दोघींनीं मला बनविलं आहे खरं. आतां सोंग कसं सजवायंच तें तरी सांगा.

**मालती**–त्यांत काय मोठंस आहे ? हें एवढं धोतर बदलायचं, एक जुना पंचा नेसायचा, आणि खांद्यावर एक मोधनं टाकायचं, एवढंच.

**अर०**–तें होईल ग. पण स्वयंपाक कसा करायचा ?

**मालती**–त्याची नको काळजी. सारे जिन्नस मी तयार करून ठेवलेत. ते नुसते वाढायचे तुम्ही.

**अर०**–आणि बाईसाहेब जेवायला बसायच्या, असंच ना ?

**मालती**–आजच्या दिवसापुरतं.

**अर०**–आणि रोज करायला हा पठ्ठ्या कांहीं डरायचा नाहीं. (शिदू प्रवेश करतो. )

**शिदू**—पान मांडायची हैत न्हव बाईसाब ?

**मालती**–शिदू, हे नवे आचारीबुवा. हे आतां जेवणाच्या वेळचं सगळं पाहतील. तूं यांच्या हाताखालीं काम करायचं बरं का. सगळं सांभाळा नीट. ( मालती, सरला आंत जातात. )

**अर०**–काय रे मुला ? शिदू नाहीं का तुझं नांव ? कशा काय आहेत रे बाईसाहेब ?

**शिदू**—कांहींच थांगपत्त्या लागत न्हाई. सभाव जरा धांदल्या दिसतुया. त्याच बाळ झालं तरी दिव्यच हये. चिकट भोकर ! मला बघितल्याधरनं सोडतच न्हाई मला. बरं, घेतलं तर गप तरी न्हातय ? ओरबाडून ओचकारून पुरे वाट करतोय.

**अर०**–मोटा खेळकर पोर दिसतोय हं.

**शिदू**–खेळकर ? घेऊन बघा ह्मणजे समजल. अन आतां लागलच कीं घ्याया. मी जर तुमचं काम करायला लागनार तर तुह्मीबी माझं काम केलंच पाहिजे.

**अर०**--जरूर. सांग काय काम करूं तें.

**शिदू**--आधीं पाटपानी करा. पन भांडीकुंडी जरा जपून वापरा हं. आपटूं नका. पोचोबिचे यायचे एखाद वेळ. तुह्मांला एक गुपीत सांगतों. हीं चांदीची भांडीं, हा सारा थाट आहे उसनवारीचा. इथं तुह्मांला जें जें दिसल तें मागामागीच हये, असं समजून चाला तुह्मी.

**अर०**—बाळमुद्धां तसंच कां ?

**शिदू**—न्हाइ जी ! त्ये बरीक घरचं हये !

**अर०**—ठीक आहे. जपून काम करतों हं मी. ( शिदू जातो. दरवाज्यांत घंटा वाजते. मालती व सरला धाईनें प्रवेश करतात. )

**मालती**—अरविंद, झटपट हं. आजोबा आले वाटतं !

**अर०**—( घड्याळयाकडे पाहून ) छट् ! अजून किती आवकाश आहे. हें पहा ( घड्याळ दाखवितो )

**मालती**—( घड्याळ पाहून व कानाशीं लावून ) पण अरविंद, घड्याळ बंद पडलं आहे हें.

**अर०**-- अरेच्या ! ( किल्ली देतो )

**मालती**—( धांदलीनं ) आतां काय बाई करायचं ? तुम्ही अजून तयार झालां नाहीं. आणि आजोबा तर आले. उठा लौकर आतां. शिदू—शिदू [ शिदू येतो ] शिदू, पहा बरं कोण आलंय तें ? ( शिदू जातो ) सांभाळून हं अरविंद.

**अर०**—त्याची नको तुला काळजी [ आंत जातो ]

**सरला**—अग पण मालती ! तुझे हात आजून पिठाचेच. पुसून ये जा लौकर, नाहीं तर सगळंच मुसळ केरांत जायचं.

**मालती**—होय कीं ग. [ हात पुसते. ]

**शिदू**—पाव्हनं आलं बाईसाब. [ आजोबा, व केतकी येतात. ]

**मालती**—कोण तें, आजोबा ! आणि केतकीताई ! आलां ? ( आजोबाला नमस्कार करते ) बरं आहे ना ?

**आजोबा**—ठीक. तूं केतकीला ओळखलंस म्हणायचं ?

**मालती**—न ओळखायला काय झालंय आजोबा ? ही लहान परकर नेसत होती तेव्हां मी पाहिली होती.

**आजोबा**—पण पाहिलीस ना आतां कशी उंच झाली आहे ती ?

**मालती**—उंच झाली म्हणून तोंडावळा कांहीं बदलत नाहीं. आजोबा, ही माझी मैत्रीण सरलाताई. पण आजोबा, प्रवासांत त्रासबिस नाहीं ना झाला ?

**आजोबा**—मला नाहीं कांहीं झाला. पण केतकीला मळमळायला लागलंय. आणि डोकंही दुखतंय म्हणते.

**मालती**—होय ग ? मग पडतेस कां थोडा वेळ निवांतपणीं ?

**केतकी**—पडतें बाई. ( शिदू वळकट्या वगैरे घेऊन प्रवेश करतो )

**मालती**—शिदू, केतकीला आंतल्या खोलींत घेऊन जा. आणि सामानही नेऊन ठेव तिकडं.

**शिदू**—होय बाईसाहेब. ( शिदू व केतकी जातात. )

**मालती**—अहो आचारीबुवा ! ( अरविंद दुसरीकडे पाहतो ) अहो, तुह्मांला हाक मारतें आहे मी.

**अर०**—काय ? मला ? मला वाटलं—

**मालती**—कांहीं नाहीं वाटलं तुह्माला. पानं मांडायची तयारी करा लौकर.

**अर०**—होय बाईसाहेब ( जातो )

**मालती**—आमचा हा ब्राम्हण कीं नाहीं, आजोबा, जरा वेंधळा आहे. अलीकड चांगलीं माणसं मिळताहेत कुठं ? आतां झटपट उरकायला सांगितलं हं. भूक लागली असेल तुह्मांला.

**आजोबा**—कांहीं नाहीं लागलेली. माझी मुळींच गडबड नाहीं. अग चार पाच दशम्या खायच्या, केव्हांही खाऊन घेईन. [ खुर्चीवर बसतो व चोहोंकडे पाहतो. ] माले ! तुमचं घर मोठं फक्कड आहे बुवा.

**मालती**—आवडलं तुह्मांला आजोबा ?

**आजोबा**—आवडलं ह्मणजे ! आणि सामानसुमानही झकास आहे हें. हे पडदे तर मला फार आवडले बघ.

**मालती**—ही सरलाताईची पसंती बरं.

**सरला**—माझं कशाला आणि मधेच.

· **आजोबा**—आणि या टेबलावरच्या जिनसाही मोठ्या सुंदर दिसताहेत.

**मालती**—हे आमच्या लग्नाचे आहेर आहेत.

**आजोबा**—पण बाळ नाहीं दिसत कुठं ? कसा काय आहे तो ?

**मालती**—छान आहे.

**आजोबा**—आणि तुझे यजमान ?

**मालती**—तेही छान आहेत. पण आज इथं नसायचं. सारखी फिरती आहे मागं लागलेली.

**आजोबा**—मग घोटाळा झाला. अरविंदरावांना भेटणं अत्यंत आवश्यक होतं मला.

**मालती**—मग आतां काय करायचं बाई ? तुह्मी तर उद्याच जाणार.

**आजोबा**—अरविंदराव लौकर येणार असतील तर एखादा दिवस मी जाणं लांबणीवरहि टाकीन. कारण काम आहे तसंच महत्वाचं. हें बघ माले ! मी आतां म्हातारा झालों. दोन दिवसांचा सोबती मी. तेव्हां ह्मटलं सगळी निरवानिरव करून मोकळं व्हावं. माझी शंभर बिघे जमीन आणि सावसावकारी मी तुझ्या बाळाच्या नावानें केली आहे. आणि तसा कागदही करून ठेविला आहे. तो कागद अरविंदरावांच्या स्वाधीन

करून पुढील व्यवस्था काय आणि कशी करायची हें मी त्यांना समक्ष सांगण्यासाठीं आलों होतों. पण पडेल कां गांठ त्यांची मी जाण्यापूर्वी ?

**मालती**—आतां काय बाई करायचं ? अरविंद इथं असते तर—पण आजोबा, बाळाला बघायचं आहे ना तुम्हांला ? आंत निजला आहे तो पाळण्यांत.

**आजोबा**—बरं आहे चल. पण अरविंदरावांना तारबिर करून जमतयं कां बघ.

**मालती**—बघतें हं. (आजोबा व मालती जातात. अरविंद प्रवेश करतो.)

**सरला**—अरविंद, ही चांगलीच भानगड झाली.

**अरविंद**—मला वाटलंच होतं तसं. ( खुर्चीवर बसतो ) आमच्या मालतीची कोणती गोष्ट सरळ झाली आहे ?

**सरला**—आतां पुढं काय करायचं अरविंद ?

**अर०**—मला तरी काय माहीत ? मालती निस्तरील आपली चूक. सरलाताई ! मालती सर्व बाजूंनीं चांगली आहे आणि अशी बायको मला मिळाल्याबद्दल मला मोठी धन्यताही वाटते. पण तिला ही कार-स्थानं करायची मोठी वाईट खोड आहे.

**सरला**—पण त्या कारस्थानांतून पार पडण्याइतकी चतुरही आहे ती.

**अर०**—असेल. पण तिची चतुराई मला चांगलीच भोंवते. तुम्हांला माहीत नाहीं सरलाताई. मागची एक गोष्ट सांगतों तुम्हांला. लग्न झाल्यावर आम्ही एक स्वतंत्र घर घेऊन बिऱ्हाड थाटलं. त्यांतला एक भागा आम्ही दुसऱ्या एका जोडप्याला भाड्यानं दिला. त्या बाईची आणि हिची जमली गट्टी आणि तिला हिनं दिली थाप कीं मी जसा गरीब दिसतों तसा नाहीं. मी चकमकपूर संस्थानच्या राजघराण्यापैकीं एक असून कांहीं अंतस्थ कारणामुळें अज्ञातवासांत गरीबींत राहिलों आहे.

**सरला**–पण असं तिनं सांगितलं म्हणून तुम्हांला त्रास नाहीं ना झाला ?

**अर०**–नाहीं कसा ? त्या बाईचा नवरा आमच्या मॅनेजरच्या ओळखीचा. त्यानं आमच्या ऑफिसांत ती कंडी पिकवली. आणि तिथं जो तो मला 'राजेसाहेब राजेसाहेब' म्हणून त्रास देऊं लागला.

**सरला**–( हंसून ) मग बरं झालं कीं. ( मालती लगबगीनें प्रवेश करते )

**मालती**–अरविंद ! ऐकलंत ना तुम्ही ? काय करायचं आतां ?

**अर०**–मला विचारशील तर या अडचणींतून निसटण्याचा एकच मार्ग आहे. आणि तो म्हणजे खरी वस्तुस्थिती सांगून मोकळं होणं हा.

**मालती**–तें नाहीं बाई जुळायचं. आम्ही लबाडी करण्याच्या बेतांत होतों असं आजोबांना कळलं तर त्यांचा राग अनावर होईल आणि ते आल्या पावलीं चालते होतील. बाळाच्या पायगुणानं मिळालेली जिंदगी मग मिळेल कीं नाहीं याची वानवाच.

**अर०**–मग करावं तरी काय ? म्हातारा म्हणतो 'तुझ्या नवऱ्याला भेटल्याशिवाय मी कांहीं जात नाहीं.'

**मालती**–तें कांहीं खरं नाहीं. त्यांनीं सरळ तिकीट काढलीं आहेत बडोद्याचीं [ थोडा विचार करून ] हां जी हां. असं केलं तर काय होईल ?

**अर०**–असं म्हणजे कसं आणखी ?

**मालती**–आपण खोट्या मिशा डकवायच्या, वेष बदलून इथें यायचं, आणि 'गाडी चुकली' म्हणून सांगायचं.

**अर०**–झाले इतके धिंडवडे पुष्कळ झाले. आतां ती नको आणि शोभा.

**मालती**–शोभा कसली यांत ? आणि त्यांत अवघड तें काय आहे ? मी नाहीं तरी लिलीला कळविलं आहे कीं तुम्हाला रंगलरी मिशा आहेत म्हणून.

तशा लावायच्या आणि मोठ्या ऐटीनं यायचं. आजोबांच्याकडून तेवढे कागद घेतले कीं झालं आपलं काम.

**अर०**–मालती तुझ्या या मेंदूला थोडी विश्रांती दे आतां. तुझ्या दर कारस्थानांतून निरनिराळं कुलंगडं मात्र उत्पन्न होतं.

**मालती**–असं काय बरं अरविंद ? आपला बाळ मोठा जमीनदार आणि सावकार व्हावा असं नाहीं कां तुह्मांला वाटत ?

**अर०**–वाटतं. आमच्यासारख्या निर्धन आईबापांच्या घरीं त्याचं शिक्षण होणार नाहीं, आणि जिंदगी मिळाली तर तो शिकून मोठा होईल, या साऱ्या गोष्टी खऱ्या. पण मालती, तूं ह्मणतीस तो नाटकी प्रयोग माझ्या हातून बेमालूम वठणं शक्य नाहीं. माझा चेहराच असा आहे कीं तो मिशा लावूनही बदलणार नाहीं. आणि मी जर तें नाटक केलं तर तुझे आजोबा ह्मणतील कीं 'माले, तुझ्या या आचाऱ्याला तासाभरांत एवढ्या लांबलचक मिशा ग कशा आल्या ?'

**मालती**–मग आतां काय करायचं ग सरलाताई ?'

**सरला**–आधीं जेवणं खाणं होऊं देत. पाहूं तोंवर एखादी युक्ती सुचते कां ?

**मालती**–होय बाई. तुझ्या पोटांत कावळे उठले असतील. आजोबांची संध्या झाली कीं बसायचं हं. केतकी कांहीं जेवत नाहीं. तिचं डोकं दुखतंय. तीनच पानं मांडा बरं कां. मी, सरलाताई आणि आजोबा.

**अर०**–आणि मी ?

**मालती**–तुह्मी आमच्याबरोबर बसून कसं चालेल ? तुह्मी मागून शिदूबरोबर स्वयंपाक घरांत जेवा.

**अर०**—होय. विसरलोंच मी. मी वाढप्या आहे नाहीं कां ? पण माझे प्राण कासावीस झाले आहेत भुकेनं. ( जातो. )

**मालती**–सरलाताई ! माझ्या डोक्यांत एक कल्पना आली आहे बघ. अरविंदांच्या समक्ष मी ती सांगितली नाहीं. आजोबांच्याकडून कागद तेवढे काढून घ्यायचे एवढं आपलं काम आहे. आजोबांचं झालं तरी दुसरं कांहीं काम नाहीं. आणि भलतीं सलतीं पत्रं लिहिण्याबद्दल ते अरविंदांची माफी मागणार आहेत ह्मणे.

**सरला**–मग ?

**मालती**–नाहीं आलं तुझ्या लक्षांत ? मी ह्मणतें एवढ्यापुरता कोणी तरी माणूस अरविंद ह्मणून पुढं आणला तर ? तास दोन तासापुरती त्यानं त्यांच्यासारखी––

**सरला**–पण असला माणुस तुला कुठला मिळणार ? तात्पुरता आचारी पाठवून द्यायला तूं हॉटेलवाल्याला सांगून आलीस, पण तात्पुरता नवरा तुला कोण देणार ?

**मालती**–मग ग ?

**सरला**–माझे सुधाकर असते तर ते मी तुला दिले असते उसने. पण ते तर इथं नाहींत.

**मालती**–खरंच. त्यांनीं हें नाटक किती छान केलं असतं. दुसरा कोणी नाहीं कां ?

**सरला**–आमचा बाबू आहे म्हणा.

**मालती**–बाबू ! तो ग कोण ?

**सरला**–माझा मामेभाऊ. तो आहे डॉक्टर. सिव्हिल सर्जन बरोबर इथं आला आहे फिरतीवर.

**मालती**–पण तो करील ना सारं काम नीट ? मग बघ कीं तो येतोय कां ?

**सरला**–पहातें हं टेलिफोनवर चौकशी करून. ( **टेलीफोन लावून** ) हॅलो कोण बोलत आहे ? मी सरला. तुमच्या आफिसांत ते डॉ०

बाबूराव आहेत ना ? हो. त्यांची बहिण मी. त्यांच्याशी बोलायचं आहे मला. त्यांच्याकडे देतां का फोन ? [ थोडा वेळ थांबून ] कोण बाबू कां ? हें पहा माझं एक काम आहे तुझ्याकडे. माझी एक मैत्रीण आहे. तिला दोन तासापुरता एक नवरा हवा आहे. तूं तेवढं काम केलं पाहिजेस. अरे नुसतं नाटक ! करशील ना ? [ हंसते ]

**मालती**–काय म्हणाले ग ? माझ्याकड दे जरा फोन. ( फोन घेऊन ) हें पहा बाबूराव मी मालतीताई बोलत आहे. सरलाताईनं सांगितलं आहेच तुह्मांला. एवढी वेळ मारून न्यायची बरं कां. माझ्या बाळाचं जन्माचं कल्याण होणार आहे यांत. तावडतोब निघून या इकडे. माझ्या घरचा पत्ता सांगतें हं. ३५४५ टण्णू गल्ली. हातांत एक प्रवासी ब्याग घ्या आणि प्रवासी पोषाख करा. थेट इथं या. दारांत थांबू नका तिऱ्हाइतासारखं. एकदम आंतच या. तिथं मी असेन. मला पहातांच " लाडके ! गाडी चुकली. " असं ह्मणा. हें पहा इथं माझे ह्मातारे आजोबा आलेले आहेत. त्यांना फसवण्यासाठीं करायचं आहे हें नाटक. अगदीं बेमालूम झालं पाहिजे ह. नवरा आपल्या बायकोशीं पूर्ण सलगीनं वागतो आहे असं वाटलं पाहिजे आजोबांना. मग आटपा तर.... Thank you (टेलीफोन खालीं ठेविते ) सरलाताई हें इतकं सगळं केलं, पण बाबूराव कसा काय माणूस आहे ग ? दिसायला चांगला आहे ना ? आणि वागणूकहि सभ्यच पाहिजे.

**सरला**–तसा तो मुळींच वावगा नाहीं.

**मालती**–पण चांगला उंचापुरा आहे ना ? नाहीं तर मी ही अशी ताडमाड उंच आणि तो असायचा मूठभर. देवा, तूंच यांतून निभावून ने रे बाबा. [ आंत जाऊं लागते. ]

**सरला**–अरविंदांना सांगायला निघालीस वाटत ?

**मालती**—होय बाई. मी त्यांच्यापासून कांहीं ह्मटल्या कांहीं चोरून ठेवित नाहीं. पण हें त्यांना सांगू कीं नको ? ते हजार शंकाकुशंका काढून वाद वाढवीत बसतील. आणि आतां तर नाहीं वेळ. [ शिदू येतो. ] चार पान वाढायला सांग जा आचारीबुवांना.

**शिदू**—होय बाईसाब. ( जातो, आजोबा रामरक्षा ह्मणत येतात. )

**मालती**—आजोबा तुह्मांला जेवायला मात्र उशीर होतोय. केतकीचं डोकं कांहीं अजून थांबत नाहीं. मी डॉक्टरना फोन करूं कां ?

**आजोबा**—नको. इथले सारे डॉक्टर फडतूस आहेत. बडोद्याला गेलों असतों ह्मणजे नव्हती काळजी. तिथले एक प्रसिद्ध डॉक्टर धावून आले असते तिच्यासाठीं. ते सत्तेचेच आहेत तिच्या.

**मालती**—ह्मणजे ?

**आजोबा**—ह्मणजे काय ? अग हे प्रीतिविवाहाचं युग आहे ना ? त्यांनीं एकमेकांना पसंत केलं आहे आणि जमलं तर पहिल्याच मुहूर्तावर सुमुहूर्त करण्याचा विचार आहे त्यांचा. तुझ्यासारखाच प्रकार आहे हा.

**सरला**—आक्काचाच कित्ता ताई गिरवणार म्हणायची ?

**आजोबा**—तिचा आहे तसा बेत. पण आह्मा म्हाताऱ्या खोडांना तें अजून कांहीं पटत नाहीं. म्हणून त्या माणसाला प्रत्यक्ष पाहून यावं व मग लग्नाला रुकार द्यावा ह्मणून मी चाललो आहे बडोद्याला. जर तो मला पसंत पडला तर याच खेपेत लग्न उरकून सुद्धां मोकळा होईन. पण काय ग माले, अरविंदांच्याबद्दल कांहीं केलीस कां चौकशी ?

**मालती**—केली पण नक्की कांहींच पत्ता लागत नाहीं. चला आजोबा आतां जेवायला. पानं वाढून झालीं असतील. [ सर्व आंत जाऊं लागतात. बाबूराव प्रवासी वेषांत येतो. क्षणभर गोंधळलेल्या नजरेनं इकडे तिकडे पहातो. मालती कोण हें सरला डोळ्यानें दाखवते. ]

**बाबू०**-[ मालतीचा हात धरून ] लाडके गाडी चुकली आणि मी परत आलों. तुला मोठी मौज वाटली असेल नाहीं ? ( मालती बाबुरावाच्या हातून हात सोडवून घेते. सरला बाबुरावाला हलकेच चिमटा घेते व कोपरखळी मारते. बाबुराव हात मोडून मागें सरतो. मालती जाते. )

**सरला**–बाबू , बायकोला कधीं भेटला नसल्यासारखं काय करतोस ? बाबू, हे मालतीचे आजोबा. अचानक आले आहेत ते. तूं आज प्रथमच पाहतो आहेस त्यांना.

**बाबू०**–हो. कसं काय आजोबा ? कशा काय आहेत आजी–( सरला पुन्हां चिमटा घेते )– नाहीं ह्मटलं, घरची मंडळी सारीं ? ठीक ?

**आजोबा**–( आश्चर्यानें पाहतो व हंसतो व सरलेकडे पाहून ) आमची माली म्हणजे तुमची वैनी वाटतं ? [ अरविंद हातांत भाताची वेळणी घेऊन प्रवेश करतो. त्याच्या मागें मालती असते. ]

**मालती**--गडे, कपडे काढून जेवायला चलायचं आतां. ( अरविंद राग आणि आश्चर्य यांनीं मालतीकडे व बाबूरावाकडे पहातो. मालती गोंधळते. सरला घाबरते. अशा स्थितींत पडदा. )

**अंक १ ला समाप्त.**



# अंक २ रा.

( **स्थळः**—पहिल्या अंकांतच. एक तासानंतर मंडळी जेवणानंतर गप्पा गोष्टी करीत बसलीं आहेत. )

**बाबूराव**—जनोबा ! ( अरविंद येतो. )

**अर०**—आलों.

**बाबूराव**—तो ग्रामोफोन लाव बरं जरा.

**अर०**—होय मालक.

**मालती**—आणि एक गोड गाण्याची प्लेट लावा. आजोबांना धांगड-धिंगाण्याचं गाणं नाहीं आवडायचं. ( अरविंद ग्रामोफोन उघडतो. त्यांत प्लेटी नसतात. तो खोलींत इकडे तिकडे पाहतो. )

**सरला**—मला बाई पेंढारकरांच्या प्लेटी आवडतात.

**बाबूराव**—पेंढारकर ! काय टेस्ट बघा ? व्यासांची प्लेट लाव जनोबा.

**अर०**—[ पेटीमध्यें एकच जुनी प्लेट असते. ती उघडून पाहतो. व्यासाची प्लेट कांहीं दिसत नाहीं. ती एकच प्लेट लावतो. तिच्यावरचा इस्मालिया बँड वाजूं लागतो. ]

**मालती**—नको नको ! तसला बाजा आजोबांना नाहीं आवडायचा ! [ शिदू पानसुपारीचें तबक घेऊन येतो. सर्वांच्यापुढें फिरवितो व टेबला-वर ठेवितो. अरविंद ग्रामोफोन बंद करतो. ]

**सरला**—तुह्मांला आजोबा गाण्याची फारशी आवड नाहीं वाटतं ?

**आजोबा**—मुळींच नाहीं. गाण्यांत लोकांना काय वाटतं हेंच मला समजत नाहीं. आणि त्याच्या जोडीला अलिकड नाचणं सुरूं झालं आहे ह्मणे. रिकामटेकड्या लोकांचा उद्योग आहे झालं.

**बाबूराव**—मला गाणं आवडतं. स्वतःला गायचं कांहीं जमत नाहीं. शिकावं ह्मटलं तर रोजच्या कामाखालींच जीव पिळून निघतो अगदीं.

**आजोबा**–मला कल्पना आहे या व्यापारी उलाढालींची. खरेदी आणि विक्री याबाहेर जगाची माहिती नाहीं त्यांना. सध्यां कसली खरेदी चालली आहे तुमच्या कारखान्यांत ? आणि कशाची विक्री करीत असतां तुह्मी ?

**बाबूराव**–( गोंधळून ) खरेदी ? विक्री ? अरे जनोबा, ग्रामोफोन सुरूं करतोस ना ?

**जनोबा**–होय मालक. [प्लेट सुरूं करतो. बँडचा धागडधिंगा सुरूं होतो.]

**मालती**–अहो बंद करा तें. कांठळ्या बसायची वेळ आली !

**आजोबा**–तुमचा हा बंगला एकंदरींत ठीक आहे अरविंदराव !

**बाबू०**–आहे आपला त्यांतल्या त्यांत बरा. पुढल्या वर्षी एक्स्टेंशनमध्यें नवीन मोठा बंगला बांधायचं ठरविलं आहे मी. इथली झाली तरी हवा छान आहे म्हणा.

**आजोबा**–छान ह्मणजे फक्कडच आहे. बाकी उकाडा मात्र प्रमाणापेक्षां थोडा जास्त वाटतो मला. बाळाला कसा काय मानवतो तो ?

**बाबू०**–कोण बाळ ?

**आजोबा**–अहो छोकरा.

**बाबू०**–कुठला छोकरा ?

**मालती**–असं काय बरं अरविंद वेड्यासारखं ? आपल्या बाळाबद्दल म्हणताहेत आजोबा. [ आजोबांना उद्देशून पण बाबूरावांच्या लक्षांत यावें या उद्देशानें ] आमच्या बाळाला इथली हवा चांगलीच मानवते. कसा अगदीं आनंदांत असतो. आतां तो सव्वा वर्षाचा झाला तर त्याचं वजन २२ पौंड आहे. आम्ही त्याला ' बाबा ' म्हणतो, तुमच्या आठवणींदाखल आम्ही त्याला ' बाबा ' म्हणतो आजोबा. त्याचे डोळे जरा घारोळे आहेत आणि अंग कसं अगदीं गोरंपान आहे.

**आजोबा**–अग पण माले, इतकी तपशीलवार माहिती कशाला सांगते आहेस ? मी बघीतला आहे ना मघाशीं ?

**मालती**–बघितला आहे हो ! पण झोंपलेला बघितलात. झोपल्यापेक्षां जागेपणीं मूल निराळं दिसतं !

**बाबू०**–अलबत निराळं दिसतं. मला तर केव्हां केव्हां बाळ मुलीसारखा दिसतो.

**आजोबा**–माले, अरविंदरावाना ओळखलं नाहीं मी. तूं त्या लिलीच्या पत्रांत ते चांगले उंच आहेत म्हणून लिहिलं होतंस नाहीं कां ?

**मालती**–होय आजोबा. अरविंद उभे राहिल्यावर उंच दिसतातच मुळीं.

**सरला**–आजोबा, बाळ तुम्हांला कोणासारखा दिसतो हो ? मला बाई आजोबासारखाच दिसतो. तुम्हांला नाहीं कां वाटत तसं ?

**आजोबा**–मुळींच नाहीं. आमच्या घरचा तोंडावळा मुळींच नाहीं त्याचा. मला वाटतं तो पितृमुखीच आहे.

**मालती**–जनोबा पाण्याचा तांब्या आणा बरं जरा.

**सरला**–आजोबा, मला वाटतं त्याची जिवणी आणि हनुवटी तुमच्यासारखी आहे.

**आजोबा**–तेवढ्या पुरतं असेल कदाचित्. पण तो एकंदरींत अरविंदासारखाच असणार !

**मालती**–आतां त्याला दात यायला लागणार वाटत.

**बाबू०**–माझं मत तुमच्या उलट आहे, आजोबा. मला तर वाटतं बाळाचा चेहरा आजोबासारखाच आहे.

**आजोबा**–उगीच कांहीं तरी सांगूं नका मला. अहो कशांत हो सारखेपणा दिसतो ?

**बाबू०**–तूर्त डोक्यांत तरी सारखेपणा दिसतोय कीं नाहीं ? तुमच्या डोक्याला केस नाहीं आणि बाळाच्या डोक्यालाही केस नाहीं.

**मालती**–पुरे झालं हें बोलणं. [ शिदू येतो ]

**शिदू**–सरलाताईसाब, तुमच्या इथली येक मोलकरीण आली हाय. ती ह्मनत्ये कीं तुमच्या घरीं टेलीपोनावर तुह्मांस्नी कोन बोलावतंय.

**सरला**–( उठून. ) सुधाकर बोलावत असतील बहुतकरून; जाऊन येतें हं.

**मालती**–पण लौकरच ये हं.

**सरला**–त्याचा नेम नाहीं. ( जाते. )

**बाबू०**–आमची सरला म्हणजे एक झकास मुलगी आहे, नाहीं आजोबा !

**आजोबा**–आहे खरी.

**मालती**–तिचं आणि सुधाकरांचं प्रेमही आहे तसं.

**बाबू०**–बरोबर. सुधाकर सरलेला फुलासारखं झेलीत असतो. तो कुठेंही गेला तरी रोज पत्रानं तरी तिची भेट घेईलच.

**आजोबा**–कोणता व्यवसाय करतात ते !

**बाबू०**–कोण सुधाकर कां ? त्यांचा व्यवसाय म्हणजे–

**मालती**–कॉन्ट्रॅक्टर आहेत ते, आजोबा !

**आजोबा०**–म्हणजे चांगल्या मेहनतीचं काम आहे.

**बाबू०**–आणि मिळकतही तशीच आहे. [ पाण्याचा तांब्या घेऊन अरविंद प्रवेश करतो ] जनोबा, ग्या एक पेला भरून इकडं.

**अर०**–होय मालक. [ पेला भरून देतो. ]

**बाबू०**–( घोट घेत ) बरं काय बरं म्हणत होतों मी ? मेहनत आणि मिळकत. कॉन्ट्रॅक्ट म्हणजे म्हशी सारखं आहे. जितकं आंबोण घालावं तितकं दूध काढावं. कॉन्ट्रॅक्टमध्यें सुद्धां जितकी मेहनत घ्यावी तितकी मिळकत मिळवावी.

**मालती**–होय; बरी आठवण झाली आजोबा. आपल्या कपिलेची आठवण झाली मला. आहे कां हो आजोबा ती ?



वाघूराव– मग तो आतां हायस्कुलांत जायला लागलो असेल ? (अंक २ग)

**आजोबा**—आहे तर. मी शेजारच्या गोविंदरावाकडे पोहोंचवून आलों आहे तिला.

**मालती**—इतके दिवस झाले तरी कपिलेची आठवण कांहीं जात नाहीं. मी कितीदां तरी सांगत असतें यांना कपिलेबद्दल.

**बाबू०**—होय आजोबा. सरासरीनें आठवड्यांतून तीन चार वेळां तरी कपिलेचं पुराण ऐकावं लागतं मला!

**मालती**—आतां आठ नऊ वर्षांची असेल ना कपिला आजोबा?

**आजोबा**—ते ग कां? बारा वर्षांची आहे ती आतां.

**बाबू०**—बारा वर्षांची म्हणजे? आतां हायस्कुलांत जाऊं लागली असेल ती! [ आजोबा आश्चर्यानें पाहतात. मालतीचा गोंधळ उडतो. ]

**मालती**—सदा आणि कदा कोट्या करायची कसली खोड ? पण आज विडा नाहीं कां खायचा?

**बाबू०**—[ तबकांतील विडा तोंडांत घालीत, तिच्या खांद्यावर हात ठेवून ] हो विसरलोंच कीं मालती? मालती, तुझ्यासारखी बायको मला मिळाली हें माझं मोठं नशीबच समजलं पाहिजे. तूं किती म्हणून माझी काळजी घेतेस. मी जेवलों कीं नाहीं, पाणी प्यालों कीं नाहीं, विडा खाल्ला कीं नाहीं, सगळीकडे तुझं लक्ष असतं. पण तुझ्या या काळजीचा मोबदला मी तुला काय देतों? [ तिच्या हनुवटीस हात लावतो. मालती रागानें तोंड फिरविते. व बाबूरावाचा हात दूर झिडकारिते. तरी पण ती उसनें हास्य आणते. ] ‘ नचसुंदरी करुं कोपा ’ [ अरविंद संतापतो, त्याच्या हातांतून कांचेचा पेला पडतो व फुटतो. ]

**आजोबा**—आचारी ठेवणं खर्चाचं काम आहे एकूण? ( मालती भीतीनें अरविंदाकडे पाहते. अरविंद ओठ चावीत कांचेचे तुकडे गोळा करतो. बाबू हंसतो शिदू येतो. तो सोड्याच्या बाटल्या व ग्लास आणतो. )

**बाबू०**–आमचा जनोबा आचारी त्या दृष्टीनं बरा आहे. पण जरा धांदल्या आहे.

**मालती**–सोडा घेतां कां लिंबू आजोबा ?

**आजोबा**–कांहींच नको मला. मी कधींच कांहीं घेत नाहीं सोडा लिंबू.

**मालती**—होय मी विसरलेंच कीं. तुह्मांला काय आवडतं अरविंद ? [ आजोबा आश्चर्यानें मालतीकडे पाहतात. आपली चूक लक्षांत येऊन ] घरच्या माणसाला काय आवडतं आणि काय नाहीं हें विचारणं लोकांना चमत्कारिक दिसेल. पण आमच्या अरविंदांच्या बाबतींत तें चमत्कारीक नाहीं. काल त्यांना सोडा आवडला म्हणून आज मी सोडा द्यायला गेलें तर लगेच ह्मणतील ' मला लिंबू हवं आहे ' म्हणून. आणि आज लिंबू घेतलं ह्मणून उद्या लिंबू द्यायला गेलें तर सोड्याची तहान लागेल यांना. खरं कीं नाहीं अरविंद ?

**बाबू०**—आपल्याला ठरावीक चाकोरींतून जाणं मुळींच आवडत नाहीं. आयुष्यांत वैचित्र्य हवं ! कित्येक लोक चहा तर चहा, सोडा तर सोडा, कॉफी तर कॉफी घेत सुटतात. मला प्रत्येक गोष्टींत बदल पाहिजे. आजच्यापुरतं ह्मणशील तर आज लिंबू ध्यायची लहर लागती आहे आमची. [ शिदू बाटली फोडतो व मालती ग्लासमध्यें ओतून बाबूरावला देते. ]

**आजोबा**--हें पाहा माले, आतां आपण मुख्य कामाला लागूं या !

**मालती**–तुमच्या मर्जीप्रमाणें.

**आजोबा**—अरविंद, तुह्मांला माहितच आहे की माझी थोडी शेती आणि सावसावकारी आहे.

**बाबू०**–होय मी ऐकलंय तसं.

**आजोबा**—आम्हांला मूलबाळ नाहीं. मी तर म्हातारा झालों. माझा कांहीं भरंवसा नाहीं. माझ्या पश्चात् माझी इस्टेट या मालीला द्यावी असा

माझा पहिल्यापासून इरादा होता. पण ही पोर माझ्या मनाप्रमाणं वागली नाहीं म्हणून मालतीऐवजी केतकीला --

**बाबू०**–असं वाटून कसं चालेल? आज्याची इस्टेट सख्या नातीला देणंच योग्य आहे.

**आजोबा**–कोणतं योग्य आणि कोणतं अयोग्य हें मला चांगलं समजतं. अन् म्हणूनच माझी इस्टेट या मालतीच्या मुलाला द्यायचं ठरिवलं आहे. आणि तुह्मी त्याचे वहिवाटदार म्हणून व्यवस्था पाहायाची आहे.

**बाबू०**—आपल्या प्रेमळपणाला कशाची उपमा द्यावी हेंच मला समजत नाहीं.

**आजोबा**–माझ्या प्रेमळपणाचं तुह्मी कसलंच वर्णन करूं नका. प्रेमळपणासाटीं नव्हे तर निर्दयपणाचं प्रायश्चित म्हणून मी ही गोष्ट करतों आहे. मालीच्या लग्नाच्या वेळीं तिला आशीर्वाद देण्याऐवजीं रागाच्या भरांत मी तिखट पत्र पाठविलीं. त्याबद्दल तुह्मी दोघांनीं मला माफी केली पाहिजे.

**बाबू०**–आम्ही ती गोष्ट विसरून सुद्धां गेलों आहोंत.

**आजोबा**–हें सौजन्य आहे तुमचं. पुढच्या व्यवस्थेचा मी कागद करून ठेविला आहे तो एकदां तुह्मी पहा. माझ्या बॅगमध्यें आहे तो घेऊन येतों मी. (जातो. मालती रागानें बाबूरावापुढें जाऊन उभी राहते.)

**मालती**—बाबूराव! तुह्मी अरविंदांचं सोंग घेतलं हें विसरलांत. फिरून फिरून 'लाडके' म्हणून मला बोलावतांना आणि माझ्या अंगाशीं इतकी लगट करतांना तुम्हांला कांहींच कसं वाटत नाहीं? तुम्हांला इथं येऊन दोन तासमुद्धां झालेले नाहींत. तुमची माझी आधीं तोंड ओळखही नव्हती. आणि इतकं असून फार दिवसांच्या ओळखीसारखी सलगी करतां! इश्श्. माणसाच्या हातून इतका लोचटपणा करवतो तरी कसा?

**बाबू०**–तुमच्या करतां! मालतीबाई तुमच्या बाळाकरतां. या बुढ्ढेबुवांच्या डोळयांत धूळ टाकण्याकरतां. तुह्मी आणि मी खरोखरीचीं नवरा

बायको आहोंत आणि उभयतांमध्यें जिवाभावाचं प्रेम आहे असं त्यांना वाटण्याकरतां हा माझा प्रयत्न आहे.

**मालती**–' लाडके, लाडके, लाडके, ' म्हणून जपमाळ घेऊन बसणं म्हणजे कां प्रेम ?

**बाबू०**–निःसंशय.

**मालती**–मग विवाहित होण्याची तुम्हांला अजून पात्रता आली नाहीं, असंच मी समजतें. प्रेम हें हृदयांत असावं लागतं. त्याचं असं पोरकट प्रदर्शन करावं लागत नाहीं.

**बाबू०**–तुमच्या या सूचनेबद्दल मालतीबाई मी तुमचा अत्यंत आभारी आहे. माझं आतां लौकरच लग्न व्हायचं आहे. माझं वैवाहिक जीवन आनंदमय व्हावं, माझ्या प्रिय पत्नीनं माझ्यावर परमावधीचं प्रेम करावं अशी एखादी गुरुकिल्ली तुम्ही मला सांगाल काय ?

**मालती**–या गोष्टी सांगून येत नाहींत. स्वतःच समजून घ्याव्या लागतात. मी तुम्हांला आतांपुरतं एवढंच सांगते कीं तुम्ही आपल्या जिभेला थोडा लगाम घाला. तुमच्या बडबडींत शाहाणपणाऐवजीं आचरटपणालाच ऊत येतो. ' कपिला हायस्कुलांत जात असेल ' हें बोलणं शाहाणपणाचं नाहीं !

**बाबू०**–मग ? यांत काय चुकलं ?

**मालती**–गाई गोशाळेंत असतात. हायस्कुलांत नाहीं. कपिला ही गाय आहे. आतां तरी आलं लक्षांत ?

**बाबू०**–( हंसून ) असं होय ? मला वाटलं ती आजोबांची मुलगी.

**मालती**–अहो पण आजोबांना मूलबाळ नाहीं हें कां तुम्हांला माहित नाहीं ?

**बाबू०**–( अरविंद दारांत येतो. त्याच्याकडे रागानें पाहून ) जनोबा, चालता हो येथून. नवरा बायको बोलत बसलीं असतांना अशा सुळकांड्या घालूं नयेत इतकीसुद्धां अक्कल नाहीं तुला ? मूर्ख !



मालती– बाबूराव, रागवूं नका अं ! (अंक २ रा)

**अर०**–( क्रोधानें पाहून ) बरं आहे. [ जातो ]

**बाबू०**–हें पहा मालतीबाई, पुरती माहिती नसल्यामुळं कांहीं चुका झाल्या असतील. पण आतां मात्र मुळींच चुका व्हायच्या नाहींत. आतां पुढचं नाटक असं रंगवितों कीं ज्याचं नांव तें.

**मालती**–तरी पण पहिल्या चुका कांहीं झाकून राहण्याजोग्या नाहींत. आणि हें पहा आजोबांच्यापुढं तुम्ही माझ्याशीं सारखे होला हो करीत असतां. काय वाटेल त्यांना ? ते म्हणतील कीं तुम्ही अगदीं बाइलबुद्धे आहांत.अधून मधून उलट बोलावं. माझं म्हणणं खोडून टाकण्याचा प्रयत्न करावा. माझे पति नुसते होयबा नसून स्वतंत्र विचाराचे आहेत, असं मला आजोबांना दाखवायचं आहे. आणि हें पहा असं पाहुण्यागत वाचकत वागू नका. घरधन्यासारखी हुकमत दिसली पाहिजे तुमच्या वर्तनांत.

**बाबू०**—बहोत अच्छा ! पण हा खेळ चालायचा आहे तरी किती वेळ ?

**मालती**–उद्यां सकाळपर्यंत. आजोबा गेले कीं झालं काम.

**बाबू०**—मलाही जायला पाहिजे उद्यां सकाळीं. मी मुलगी पाहायला जाणार आहे बडोद्याला, उद्यां सकाळच्या गाडीनं.

**मालती**–उपवर मुलामुलींची खाण आहे कीं काय त्या बडोद्यांत ? बरं, तें असूं दे, तुमची खोली उजव्या हाताला आहे बरं कां.

**बाबू०**–हरकत नाहीं. (ब्याग घेऊन त्या खोलीकडे जावयास निघतो)

**मालती**–पण बाबूराव, तुम्हांला मी जें बोललें त्याच्याबद्दल राग मात्र मानूं नका बरं. तुम्ही खरोखरच आज माझं मोठं काम केलं आहे.

**बाबू०**–कशाचं, कशाचं ? पण काय हो मालतीबाई, हा तुमचा ब्राह्मण जनोबा माझ्याकडं मारकया म्हशीसारखा कां पाहतो बरं ? त्याचं डोकं कांहीं ठिकाणावर दिसत नाहीं ? हातांतले जिन्नस काय पाडतो !

**मालती**–तुमचं नशीब समजा कीं मारीत नाहीं तुमच्या डोनयांत ! बरं तें राहूं दे. ब्याग ठेवून या लौकर. नाहीं तर बसाल तिथंच. .आजोबांचा खोळंबा नाहीं करायचा. [ जातो. ] शिदू, अरे शिदू [ शिदू येतो ] शिदू, या बाटल्या आणि हे ग्लास घेऊन जा बरं. आणि हें पहा शिदू, माझं अंथरूण आंत स्वयंपाकघरांत घाल.

**शिदू**—व्हय बाईसाब.

**मालती**—भांडींबिंडीं तूंच घासून टाक. जनोबाला नको नाम देऊंस. ते काय दोन दिवसांपुरते आहेत.

**शिदू**—मग काय घालवून देणार त्यांना ?

**मालती**–तमंच कां म्हणेनास ?

**शिदू**-मानुस यथायथाच दिसतुया म्हना. पर चलाखबी हाय हां !

**मालती**–तुला आवडला म्हणायचा ?

**शिदू**–गमत्या गडी हाय मोटा. म्हनत व्हता ‘ आपली बायको नाटक मोठं फक्कड करतिया. ’

**मालती**—तुला रे काय करायच्या त्याच्या बायकोच्या गोष्टी ?

**सिदू**—आपलं सहज इचारलं गमतीनं. मी ह्मटलं ‘ आपलं घर कुठं आहे ? मुलंबिलं किती आहेत ? ’ तवा त्यानं सांगितलं कीं घर हाय इथंच. एक मूलबी झालंय. पर बायकोला नाटक करायचा नाद लागल्याधरनं आपल्याकडं तिचं लक्षच न्हाइ.

**मालती**–असं सांगितलं तुला त्यानं ?

**सिदू**–व्हय ! बायकोचं नाव काढतांच त्येचा चेहरा असा पडला म्हन्ता !

**मालती**–पुरे झाला तुझा गोष्टी-वेल्हाळपणा. आपल्या कामाला लाग, आणि आतां इकडंतिकडं फिरूं नको. आमचं थोडं महत्वाचं काम आहे. आणि हें पहा, आज पाळण्याजवळ तूं निज. मी बाळाला घेऊन ठेवतें. ( जाते. )

**शिदू**–अहो जनोबा ! अहो जनोबा ! या कीं जरा. [ अरविंद येतो ] या बाटल्या ग्लास सगळं आंत नेऊन ठेवाया सांगितलंय बाईसाबांनीं ( हळूंच ) जनोबा, एक गंमत सांगू कां ? मालकांचा अन् मालकीण बाईचा खटका उडालेला दिसतुया !

**अर०**—कशावरून ?

**शिदू**—मालकीणबाईनीं सैपाघरामंदी एकटीचं अंथरूण घालाया सांगितलंय.

**अर०**—आं ! खरंच ?

**शिदू**–तर जी ! अन् बाळाजवळबी ह्योच गडी निजायचा हये आज. ( अरविंद हंसतो. ) जरा यवढी चादर धराया लागा बरं ! ( इतक्यांत टेलीफोनची घंटा वाजते. ) काय लेकाच्यांचं काम असतं काय कीं! सारखं वाजवत सुटत्यात ! ( रिसीव्हर घेऊन ) हलाव, हलाव, कोन ? काय हाव ? कोन अरविंदराव ? हत नाय. मी व्हय ? तुमचा बा !

**अर०**–ए गाढवा, काय बोलतोस हें ? कुणाशीं कसं बोलावं हें सुद्धां समजत नाहीं कां ? टेलिफोन घ्यायला सुद्धां येत नाहीं तुला ? आण इकडं.

**शिदू**–घ्या बाबा. आमच्या बानंबी बघितलं नव्हतं असलं यंतार ! ( अरविंदाच्या हातांत देतो. बाबूराव दुसऱ्या बाजूनें येतो. )

**बाबू०**—काय चाललीय रे टेलीफोनशीं दंगामस्ती ? आपलं काम दिलंय सोडून आणि लागलेत टिवल्या बावल्या करायला. आण इकडं तें. ( अरविंदाच्या हातांतून टेलिफोन घेतो. ) व्हा चालते येथून ! हॅलो. कोण फौजदार साहेब ? मी अरविंद. काय काम आहे ? होय. त्याचं नाव जनोबा. कां ? त्याचं दुसरं नांव मला नाहीं माहीत. काय म्हणतां ? तो खरा आचारी नव्हे ? तो चोर आहे म्हणतां ? काय ? ( आजोबा कागद घेऊन येतात. ) इथंच आहे तो. तुम्ही त्याला इथं येऊन पकडत कां नाहीं ? असं होय? ठीक आपण इशारा दिल्याबद्दल मी आपला आभारी

आहे. बरं आहे. कांहीं कमीजास्ती झालं तर कळवीन. (टेलीफोन ठेवतो.)

**आजोबा**–हे कागद. ( कागद ठेवतो. )

**बाबू०**–( ऐटीनें खुर्चीवर बसत. ) काय लेकाची एक एक भानगड तरी ! फौजदारांनीं सांगितलं कीं ' आमच्या आचाऱ्यावर नजर ठेवा ' म्हणून. तो खरा आचारी नसून लख्या लंगोट्या नांवाचा एक बदमाष आहे ह्मणे !

**आजोबा**–काय ? मला वाटलंच तसं त्याच्या चर्येवरून.

**बाबू०**–आणि मलाही खुनी माणसासारखी दृष्टी दिसते त्याची.

**आजोबा**–पण तो इथं आला हें फौजदारांना कसं कळलं ?

**बाबू०**–एका डिटेक्टीव्हानं पाहिलं त्याला आमच्या घरांत. अशीं सोंगं घेऊन तो थोरामोठ्यांच्या घरीं शिरकाव करून घेतो, आणि मारतो डल्ला.

**आजोबा**–मालतीला हें कळलं ह्मणजे पुरी घाबरगुंडी उडेल तिची. सांगतोच तिला जाऊन.

**बाबू०**–नको. मुलखाची भित्री आहे ती.

**आजोबा**–बरं, पण पुढं काय तजवीज करायची योजली आहे तुह्मी ?

**बाबू०**–काय करावं बरं ?

**आजोबा**–निदान हाकलून तरी लावा आजच्या आज. नाहीं तर रात्रींतून आमचं उडवायचा चंदन आणि व्हायचा पसार.

**बाबू०**–मुळींच भिऊं नका आजोबा तुम्ही ! फौजदारांनीं स्पेशल बंदोबस्त ठेवला आहे. त्याचा बाप आला तरी तो निसटूं शकायचा नाहीं येथून. पण मालतीला विचारल्याशिवाय त्याला घालवून दिलेलं तिला आवडायचं नाहीं.

**आजोबा**–अशा बाबतींत सुद्धां तुह्मांला बायकोला विचारावं लागतं ? घरचे मालक कोण तुह्मी ? कां ती ? नोकर ठेवायचं किंवा तो काढून टाकायचं पुरुषांचं काम. तें जर तुमच्या हातून होत नसेल तर मी

करतों. चोराला घरांत ठेवायचं ह्मणजे काय ? ( उठून आंत जाऊं लागतो )

**बाबू०**—नको आजोबा. मीच करतों तो बंदोबस्त. जनोबा ! मला तुझ्याशीं बोलायचं आहे जरासं. [ अरविंद येतो. ] आजोबा, तुह्मीं जरा येथून जातां कां ? कदाचित् काम बिथरण्याचा संभव आहे.

**आजोबा**—मी इथंच राहणार. मी म्हातारा असलों तरी खेडेगांवात राहणारा आहे. बिथरलेल्या माणसाशीं गाठ पडायचा माझा आजचा कांहीं पहिलाच प्रसंग नाहीं.

**अर०**—कां बोलविलं मला ?

**बाबू०**—हें पहा, तुझ्या नोकरीची आह्मांला जरूरी नाहीं. तेव्हां आपला रस्ता सुधारा !

**अर०**—कां बरं ?

**आजोबा**—तूं खरा आचारी नाहींस ह्मणून.

**अर०**—बरोबर ओळखलंत आपण. खरोखरच मला आचारी व्हावं लागलं. पण आपण कसं ओळखलंत तें ?

**बाबू०**—कसं आणि काय, तुझंच कारस्थान नाहीं ओळखलं तर तुझ्या बायकोचंही कारस्थान कळलं आहे मला.

**आजोबा**—आं ! याला आणि बायको आहे कां साथीदार ?

**अर०**—जरा थांबा. तुम्हां लोकांना मला हेंच सांगायचं आहे कीं या कृत्यांत माझ्या बायकोचा यत्किंचितही संबंध नाहीं. हा सारा बेत माझा मी आंखलेला होता.

**बाबू०**—पण आम्हीं कांहीं बोळयानं दूध पित नाहीं. तुझ्याहून आह्मी सवाई वस्ताद आहोंत बरं कां लखोबा ?

**अर०**—कोण आपण ह्मणालांत ?

**बाबू०**—ऐकूं येत नाहीं वाटतं ? मी तुला लखोबा म्हटलं. आतां आलं ना नीट ऐकूं ? अहो राजेश्री, तुमचं खरं नाव लख्या लंगोटे आहे. तें तुह्मांला माहीत नाहीं ह्मणून भागायचं नाहीं.

**अर०**—[ हंसून ] आणि मी नाकारीतही नाहीं. ✓

**बाबू०**—नुसतं नांवच कळलं नाहीं आह्मांला तुझं तर तुझं सारं पूर्वचरित्रही आह्मांला कळून आलं आहे. गेल्या महिन्यांत तूं नाशिकच्या तुरुंगांत होतास. त्याच्यापूर्वी तूं विसापूरची हवा खाल्ली आहेस. गेल्या वर्षी तूं पुण्यांत घरफोडी केलीस. अन् तुझी बायको ती साळी, ती तुझ्या मदतीला असते, हेंही कळलं आहे आह्मांला.

**अर०**—काय ! माझ्या साळीचीसुद्धां बातमी काढलीत तह्मी. कुणाकडून तुह्मांला कळलं हें इतकं सारं ?

**बाबू०**—अरे पोलीसांकडून. तुझ्यावर आहेतच ना ते ?

**अर०**—बरं आतां पुढं काय करायचा विचार आहे तुमचा ?

**बाबू०**—विचार कसला ? आह्मी पोलीसच्या ताब्यांत देणार तुला.

**अर०**—कोणत्या आरोपावर ?

**बाबू०**—अरे वा ! पक्का कायदेबाज दिसतोस कीं ! घरफोडीच्या आरोपावरून. कळलं नीट.

**अर०**—कळलं. पण तुह्मी असं करूं शकणार नाहीं. मी कांहीं तुमचं घर फोडून आंत आलों नाहीं. तुह्मी होऊन मला ठेवून घेतलं आहे. आणि मी कांहीं तुमची चोरीही केलेली नाहीं.

**बाबू०**—हें पहा. या तुझ्या गप्पा फौजदारपुढें सांग. आमच्या मनांत असेल तर आह्मी तुला पोलिसच्या स्वाधीन करून मोकळेही होऊं. पण माझा तसा विचार नाहीं. मी तुला फक्त नोकरीवरून काढून टाकलं आहे. आपलं चंबूगबाळा घे आणि आताच्या आतां चालता हो येथून.

**अर०**—आतां ? आणि अशा रात्रीं ?

**बाबू०**—हो आतां ! अशा रात्रीं !

**अर०**—पण साहेब, आपल्याला नाहीं तें जमायचं. बाहेर काळोख कोण पडला आहे ! वारा किती गार सुटला आहे ! आणि पाऊसही पडतो आहे बारीक बारीक ! ही हवा मला बिलकूल सोसायची नाहीं.

**आजोबा**—चोर तो चोर आणि तब्बेतखोर ! लेका !

**बाबू०**—मुकाट्यानं जातोस कीं फौजदारला बोलवूं ?

**अर०**—हें पहा मिस्टर, असे तिरीमिरीवर येऊं नका. मी तुम्हांला असं सांगतों, बाबूराव नाहीं कां तुमचं नांव ?

**बाबू०**—कुठला बाबूराव ? माझं नांव अरविंदराव आहे.

**अर०**—अरेच्या ! विसरलों कीं. बरं तर अरविंदराव, आपण माझ्याशीं सरळपणानं वागावं अशी आपल्यापाशीं माझी नम्र विनंति आहे. आपण मला नोकरीवर ठेवलं आहे, आणि आतांपर्यंत मी माझं काम चोखपणानें बजाविलंही आहे. आतां आपण निवांतपणें झोंप घेऊं, अन्—

**आजोबा**—निवांतपणें झोंप !—तुझ्यासारखा बदमाष घरांत वसतीला असतांना आम्हांला क्षणभर तरी झोंप लागणं शक्य आहे कां ? हें पाहा अरविंदराव, तुम्ही जर या चोरट्याला ठेवून घेणार असाल तर याच पावलीं मी आपला स्टेशनचा रस्ता धरतों. ( मालती प्रवेश करते. व कांहीं तरी घोटाळा आहे असें पाहून घाबरते. )

**मालती**—काय भानगड आहे ? काय झालं आहे आजोबा ?

**बाबू०**—कांहीं विशेष नाहीं मालती. मी या आचारीबुवांना बडतर्फ केलं आहे.

**मालती**—बडतर्फ ! आणि यांना ? तुम्हांला तसं करतां येणार नाहीं.

**आजोबा**—माले !

**मालती**–पण आजोबा ! कायमच्या नोकराला हे तरी कसं हाकलून देऊं शकतील ?

**आजोबा**–नोकर ठेवणं किंवा नोकराला काढून टाकणं, नवऱ्याच्या मर्जीची गोष्ट आहे. मालती ! विनाकारण लुडबुड करूं नकोस मध्यें !

**मालती**–करणार. गरीब बिचाऱ्या नोकराला अशा अपरात्रीं आणि थंडीवाऱ्यांत मी घालवूं देणार नाहीं. त्यांनीं इथेंच राहिलं पाहिजे. यालाही कांहीं कारणं आहेत.

**आजोबा**–पण यानं तिळभरसुद्धां इथं राहतां कामा नये. माले, तुझ्या-पेक्षां याची आम्हांला अधिक माहिती आहे. हा जनोबा खरा नव्हे. [ मालती घाबरून पाहते. ] हा लख्या लंगोट्या आहे. अग हा पक्का बदमाष आहे.

**मालती**–बदमाष ! आणि तो कसा ?

**बाबू०**–यानं तुरुंगाच्या कितीक यात्रा केल्या आहेत. म्हणून मी म्हणतों, यानं आजच्या आज गेलं पाहिजे येथून.

**मालती**—पण आपल्या इथं त्यानं लफंगेगिरी केली नाहीं ना ?

**बाबू०**–मी घराचा मालक आहे. लख्या, चालता हो येथून.

**अर०**–होत नाहीं. आधीं माझा पगार चुकता करा.मग पाहतां येईल.

**बाबू०**–काय ?

**अर०**–ऐकूं येत नाहीं नीट ? तुम्ही मला नोटीस दिल्यावांचून कामा-वरून कमी करतां आहांत. या महिन्याचा पगार रुपये तीस, शिवाय एक महिन्याचा अधिक पगार रुपये तीस असे साठ रुपये द्यावे लागतील तुम्हांला.

**बाबू०**—उंः ! साठ रुपड्याच ना ? मालती देऊन टाक याला पैसे.

**मालती**–द्या वाटलं तर. घरचे मालक तुम्हीं तर पगारही तुम्हीच द्यायला हवा.

**बाबू०**—बरं तर. आपण ही गोष्ट सकाळपर्यंत लांबणीवर टाकूं. सकाळीं करतां येईल याची तजवीज.

**आजोबा**—अरविंद, आतांच्या आत्ता याचे पैसे चुकते करून याची रवानगी करा.

**बाबू०**—हं ? बरं. अशा माणसाला पैसे देणं म्हणजे नासाडीच. [ खिशांतून नोटा काढून अरविंदांच्या हातांत देतो. ) हं हो चालता आतां. पुन्हां जर इथें दिसलास तर अंदमानला लावून द्यायची तजवीज करीन .

**अर०**—हं ! ( जाऊं लागतो. )

**मालती०**—थांबा, मी यांना अशा वेळीं बाहेर घालवूं देणार नाहीं. अशा सर्द हवेंत बाहेर पडल्यावर यांना थंडी होते, आणि हे आजारी पडतात. हें मला नेहमीचं माहीत आहे.

**बाबू०**—बाईसाहेब, अकलेचं प्रदर्शन झालं इतकं बस्स झालं. याला सरदी व्हायच्या ऐवजी तुझं डोकं गरम झालेलं दिसतंय. जा, जाऊन निज जा मुकाट्यानं.

**मालती**—( बाबूचा हात हिसकावून ) माझं डोकंही गरम झालं नाहीं. आणि मीं निजायलाही जात नाहीं.

**बाबू०**—मालती, तुझी मगरुरी वाढत चालली. हें मला बिलकूल सहन होणार नाहीं. माझ्या आतांपर्यंतच्या गरीबपणामुळं तूं फार शेफारूं लागलीस. मी होऊन तुझ्यावरच्या प्रेमांत कसूर केली नाहीं; कीं तुला उण्या उत्तरानं बोललों नाहीं. तूं म्हणशील त्याला मुकाट्यानं मान हालवणारा मी होयबा आहे अशी तुझी कल्पना असेल तर ती चूक आहे. मालती, आपली अधिक शोभा करून घेऊं नकोस. चालती हो. ( मालतीच्या मुद्रेवर संताप, अपमान वगैरे विकार उमटतात. तिला बोलायचें असतें. पण बोलत नाहीं. ती पाय आपटीत आंत जाते. )

**अर०**–( पुढें होऊन ) फक्त एकच मिनीट—

**बाबू०**–[ त्याचेकडे वळून व दरवाज्याकडे बोट दाखवून ] चालता हो. [ अरविंद त्याच्याकडे रागानें पाहतो, व ' बरं आहे पाहून घेईन ' अशा अर्थानें मान हालवून निघून जातो ] आजोबा, आमच्या घरची ही लाथाळी तुमच्यासमोर व्हावी याचं मला फार वाईट वाटतं. मालती खरोखरच समजूतदार आहे. पण अधून मधून तिच्या डोक्यांत कांही तरी वेड शिरतं. आणि मग मला विश्वरूप प्रगट करावं लागतं.

**आजोबा**–मला वाटलंच होतं कीं तुमचा दोघांचा पहिला लडिवाळपणा कांहीं सदोदित टिकणारा नव्हे.

**बाबू०**–नाहीं, नाहीं. तसा लडिवाळपणा भरपूर आहे ! बरं पण आतां ते कागद पाह्यचे ना ?

**आजोबा**–हो. हे पहा. ( दोघे कागद वाचूं लागतात. )

**अंक २ रा समाप्त.**

# अंक ३ रा.

( अरविंद आराम खुर्चीवर पडला आहे. त्याच्या हातीं जळती सिगारेट व दुसऱ्या हातांत वर्तमानपत्र आहे. सर्व दिवे मालवलेले असून फक्त त्याच्या मागला दिवा लागलेला आहे. थोड्या वेळानें दारांत सरलेची चाहूल ऐकूं येते. )

**अरविंद**—कोण ? सरलाताई ? या कीं.

**सरला**—सर्व मंडळी झोंपली वाटतं ?

**अर०**—नाहीं. मालती आपल्या मावस बहिणीबरोबर बोलत बसली आहे वाटंत. बसा ना. मघाशीं मध्येंचशा घरीं गेलांत लगबगीनं ?

**सरला**—मुंबईहून सुधाकरांचा फोन आला. मोठ्या उमेदीनं ते ज्या कामासाठीं गेले त्या कामाचं कांहीं जमत नाहीं असं ह्मणत होते. अरविंदराव, सुधाकरांचे ग्रह कांहीं ठीक दिसत नाहींत अलीकडे. दोन तीन महत्वाच्या कामीं त्यांना असाच गोता बसला. कामाला जाऊन हात हलवीत परत येणं त्यांना अतीशय लाजिरवाणं वाटतं, आणि ते मनाला फार लावून येतात. ‘ आज रात्रीच्या गाडीनं परत येतों ’ ह्मणाले. आतां त्यांना हुरूप येण्यासारखं मी करूं तरी काय असं मला झालं आहे.

**अर०**—सहाजीक आहे.

**सरला**—दुसरी गोष्ट ह्मणजे सामानसुमानाची. ते चार आठ दिवस येणार नाहींत ह्मणून मी साऱ्या वस्तू इथं धाडून दिल्या. आतां सुधाकर आल्यावर सारं घर ओकं ओकं पाहून त्यांचं डोकं चढायचं एखाद्या वेळीं. आपल्या घरांतल्या वस्तू इकडच्या तिकडे झालेल्या खपत नाहींत त्यांना.

**अर०**—आलं लक्षांत माझ्या सारं कांहीं. तुह्मी मालतीला आपल्या घरच्या जिनसा उसन्या दिल्यात ह्मणून तुह्मी आपल्या घरची गैरसोय, करून घ्यावी असं नाहीं. बरं, सुधाकर किती वाजतां येईल इथं ?

**सरला**–साधारणपणें तीन वाजतां.

**अर०**–आतां किती वाजले ?

**सरला**–[ घड्याळाकडे पाहून ] तुमच्या घड्याळांत तर पावणेसातच वाजले आहेत. खरं ह्मणाल तर अकराचा तरी सुमार आला आहे.

**अर०**–ठीक आहे. तुमच्या साऱ्या जिनसा मी बाराच्या आंत तुमच्या घरीं पोहोचत्या करतों.

**सरला**–तसं झालं तर, अरविंदराव, फार छान होईल बघा. पण मग आजोबांची समजूत कशी घालाल ?

**अर०**–तें काम मालतीचं. ती काढील कांहींतरी शक्कल आणि बसवील म्हाताऱ्याला गप्प.

**सरला**–मी लागतें वाटलं तर सामान गोळा करायला. पण दिवे लावूंया कां आणखी एक दोन ?

**अर०**–अं हं. ही आवराआवर आह्माला अगदीं शांतपणें करायला हवी. कारण या घरांत मी आहे हें कोणाला कळतां उपयोगी नाहीं. अहो, माझी हकालपट्टी झाली आहे आज.

**सरला**–तुमची हकालपट्टी ! आणि कुणी केली ती ?

**अर०**–मालतीच्या उसन्या नवऱ्यानं. चांगला अट्टल दिसतोय हं लेकाचा. त्यानं आपलं सोंग मात्र झकास वठवलं आहे ! बायकोशीं सलगी करण्याचं ॲक्टींग मात्र थोडं ओव्हर होतं.

**सरला**–अजून अविवाहित आहे—पण त्यानं तुमची हकालपट्टी केली म्हणजे काय केलं ? मी गेल्यानंतर कांहीं झाली वाटतं भानगड ? तोपर्यंत ठीक चालला होता सारा कारभार.

**अर०**–जेवीपर्यंत अगदींच मिळमिळीत वागत होता. पण जेवल्या-नंतर कसा एकाएकीं संचार झाला कोण जाणे ! अगदीं पिसाळला जसा कांहीं ! पितोबितो म्हणावं तर तसंही दिसत नाहीं.

**सरला**–मग काय झालं बाई !

**अर०**–मी तरी काय सांगूं ? त्यानं मला समोर बोलावलं आणि मी कोणी चोर लफंगा आहे असं म्हणून दिला गच्चू. मालतीनं रदबदली केली, पण त्यानं मुळींच दाद दिली नाहीं. ‘ चालती हो ’ येथून असं सांगून—

**सरला**–असं सांगितलं त्यानं ? आणि मालतीला ? मग ती काय म्हणाली ?

**अर०**–कांहीं नाहीं. ती नुसती पाहात राहिली त्याच्याकडे, अन् पाय आपटीत आंत गेली झालं.

**सरला**–आणि तुम्ही काय केलंत ?

**अर०**–छत्री घेऊन पावसांत उभा राहिलों घटकाभर आणि पोटभर हसलों.

**सरला**–तुम्हांला हसतांना पहायला मिळालं असतं तर मीही हसलें असतें. कारण दुर्मिळच गोष्ट आहे ती जरा.

**अर०**–होय. मी उगाच हंसत नाहीं कधीं आचरटासारखा फिदी-फिदी. पण तशी मौजच झाली तर माझ्यासारखा हसणारा मीच. त्यानं जेव्हां मालतीला चालती हो म्हणून फर्मावलं तेव्हांचा तिचा चेहरा पाहून दगडसुद्धां हंसला असता.

**सरला**–तुह्मी घरांत आहांत हें कुणाला माहीत नाहीं वाटतं ?

**अर०**–मालतीशिवाय कुणाला माहीत नाहीं. तिनं मला मागील दारानं आंत घेतलं आहे. बरं, झालं कां तुमचं सामान गोळा ?

**सरला**–झालंच ह्मणायचं मुख्य मुख्य. आतां कपबशा आहेत. पण त्या चालतील राहिल्या तरी सकाळपर्यंत. आतां मी ही करंडी नेतें, आणि तुह्मी तेवढं ग्रामोफोन वगैरे घ्या आणि चला.

**अर०**–ठीक आहे. व्हा तुह्मी पुढं, आलोंच मी कोट घालून. ( सरला जाते. अरविंद कोट घालून ग्रामोफोन घेऊन जाऊं लागतो. मागून बाबू येतो. )

**बाबू०**—[ पिस्तूल रोखून ] ठेव खालीं तें.

**अर०**–[ ग्रामोफोन ठेऊन ] थांबा, मारूं नका.

**बाबू०**–[ दिवे लावून ] खासा सांपडलास. तुझी लफंगेगिरी या घरांत चालयची नाहीं. ( दोघे एकमेकांकडे पाहात राहतात. ) अरेच्या ! तरीपण आपली कारवाई केलीसच तूं ! ( पाहून ) इथली करंडी नाहीं दिसत कुठं ? पण जाते कुठं ? तुला तर पकडला आहेच आतां. तुझ्या साळीनं लांबवली असेल ती. तिला पकडायला काय उशीर ?

**अर०**–अहो मिस्टर, चुकतां आहां तुह्मी. मी इथं चोरी करीत नव्हतों. तुह्मी जर मला माझ्या बायकोला जरासं भेटूं द्याल तर सारा उलगडा आपोआप होईल. तीच सांगेल सारं कांहीं.

**बाबू०**–तुझ्या बायकोच्या भेटीला तुला मोकळा सोडूं ह्मणतोस ? खासा न्याय ! एकटा तूंच माझी पुरेवाट करतो आहेस आणि तुझ्या मदतीला तुह्मी साळी आल्यावर–

**अर०**–माझ्या मदतीला तुह्मी म्हणतां ती साळी मुळींच नको आहे. मी माझ्या बायकोला–मालतीला–भेटूं इच्छितों.

**बाबू०**–मालती माझी बायको आहे. भलभलतं बोलशील तर जास्तच खोड्यांत अडकशील. आणि काय करायचं आहे रे तुला मालतीला भेटून ? मघांसारखा ती आतांही तुझा कैवार घेईल असं तुला वाटलं होय ? तिची तुझी भेट होणं शक्य नाहीं. दुसरा कांहीं पुरावा असला तर दे.

**अर०**–पण हात असे वर करून मला काय करतां येणार ?

**बाबू०**–मघाशीं माझ्याकडून घेतलेले साठ रुपये टाक आगोदर.

**अर०**–अहो पण हात वर आहेत ना ?

**बाबु०**—एक हात खालीं कर. पण लक्षांत ठेव. जर कांहीं माकडचेष्टा करशील तर मुडदा पडेल तुझा. [ अरविंद खिशांतून नोटा काढून देतो.] हं कर वर हात.

**अर०**—तुम्ही जर स्वस्थपणें माझं हाणणं ऐकून घ्याल तर—

**बाबू०**—ठीक आहे सांग काय तें—

**अर०**— खालीं बसूं कां ?

**बाबू०**—हं बैस ( अरविंद कोपऱ्यांतील टेबलापाशीं बसतो. )

**अर०**—हें पहा मस्करीची कुस्करी होते म्हणतात त्यांतला प्रकार झालाय हा सगळा.

**बाबू०**—पण ही तुझी मस्करी तुला फार महाग पडणार.

**अर०**—पहिली गोष्ट ही कीं, मी खरा आचारी नव्हे.

**बाबू०**— तूं खरा चोरटा आहेस हें मला ठाऊक आहे.

**अर०**—मी चोरटा मुळींच नाहीं...पण हे पहा, मला सरळ सांगू द्याल तर बरं होईल. [ बाराबंदी व कानटोपी घातलेले आजोबा प्रवेश करतात.] बरोबर ! मला वाटलंच कीं हा लफंगा अजूनपर्यंत घरांत असला पाहिजे. झोपच लागेना मला. ( इकडे तिकडे पाहून ) अरे ! पण इथले पडदे बिडदे काय झाले ?

**बाबू०**—यानं सगळं घर धुऊन ठेवलंय. मी त्याला अगदीं अचानक पकडला.

**आजोबा**—असली चोरी मी माझ्या जन्मांत नाहीं पाहिली कधीं. पण यानं हे हात कां वर धरलेत असे ? हा मुसलमान असून अल्लाचा धावा करतोय वाटतं ?

**बाबू०**—नाहीं. लख्या कर हात खालीं. बसा आजोबा. हा लख्या आतां कबुली जबाब देणार आहे. हं बोल रे.

**अर०**—माझा बेत फिरला. मला कांहीं सांगायचं नाहीं.

**बाबू०**—असं कां ? मग भोग तर आपल्या कर्माचं फळ ( पिस्तूल अरविंदावर रोखून टेलिफोन करतो ) कोण तें ? फौजदार साहेब कां ? ठीक. मी अरविंद बोलतो आहे. लख्या लंगोट्या नांवाचा चोर आमच्या घरांत घुसला आहे आणि मी त्याला पकडला आहे. होय. आमचं घर कां ? ३५४५ टण्णू गल्ली. ( रिसीव्हर ठेवतो ) ठीक. येताहेत ते लौकरच. ( मालती येते. )

**मालती**—काय झालं आणखी ? अगबाई ! इथलं सामान काय झालं?

**अर०**—सर्व सामान अगदी जास्तानी आहे. उगीच कावाकाव नका करूं.

**आजोबा**—जास्तानीं हं ? माले, अजून तरी शाहणी हो. या भामटयानं डल्ला मारला आहे, समजलीस ?

**मालती**—आजोबा ! पुन्हा काय तेंच तेंच उकरून काढतां ? हे कांहीं खरोखरीचे भामटे नाहींत.

**आजोबा**—आतां जुलूम झाला हाणायचा. प्रत्यक्ष आपल्या डोळयावर विश्वास नाहीं ठेवायचा आम्ही ? तुझ्या नवऱ्यानं मुद्देमालासकट पकडलंय त्याला.

**मालती**—पण मी म्हणतें, यानीं जरी जिन्नस लांबविले असतील तरी ते जास्तानीच आहेत. कुठं आहेत हो ते जिन्नस ?

**अर०**—सरलाताईना दिले आहेत ते मी.

**आजोबा**—तुझ्या परवानगीशिवाय वाटेल त्याला वाटेल तो जिन्नस देणारा हा चोर ग कोण ?

**अर०**—त्यांनीं मागितले म्हणून मी दिले.

**आजोबा**—चल लबाड कुठला ! या मध्यान रात्रीं आली आहे सरलाताई तुझ्याकडं मागायला. इतकी कसली निकड लागली तिला ?

**अर०**—त्यांना ते आपल्या यजमानाला दाखवावयाचे आहेत.

**आजोबा**–असा ब्रम्हघोटाळा मी आज पहिल्यांदाच पाहतों आहे. हाकलून लावलेला माणूस घरांत शिरतो काय, चीज वस्तू गोळा करतो काय, आणि शेजारणीला ते देऊन टाकतो काय ! आणि कशासाठीं ? तर म्हणे तिच्या नवऱ्याला दाखवायसाठीं ! कमाल झाली या फसवे-गिरीची. कोणी कोणी विश्वास ठेवणार नाहीं, चोरा, तुझ्या या थापावर.

**मालती**–मी ठेवतें यांच्या सांगण्यावर विश्वास.

**आजोबा**–भागलंच कीं मग. ठाण्यालाच रवानगी केली पाहिजे तुझी माले.

**बाबू०**–पण तें कशाला ? याचा शाहानिशा काय तेव्हांच करतां येईल. सरलाताईचा टेलिफोन नंबर किती बरं ?

**मालती**–४२०२.

**बाबू०**—अच्छा. ( टेलिफोन करतो. ) हॅलो, सरलाताई कां ? मी अरविंद. आमच्या आचाऱ्यानं म्हणे तुम्हांला इथले जिन्नस दिले ? खरं आहे कां हें ? ठीक. [ रिसीव्हर ठेऊन ] मी स्वतःच येऊन सांगतें असं म्हणते सरलाताई.

**मालती**–उलगडा होण्याऐवजीं जास्तीच घोटाळा माजायला लागला ( सचिंत बसते )

**बाबू०**–आजोबा, तुम्ही आतां जाऊन पडा. मी करतों आतां पुरता बंदोबस्त.

**आजोबा**–छे, छे ! मी बाहेरच्या दारांत फौजदारांची वाट पहात बसणार. ( जातो. दारांतील घंटा वाजते. )

**मालती**–[ उठून ] अगबाई ! कोण आलं आणखी ?

**बाबू०**–फौजदार दिसतात आलेले.

**मालती**–म्हणजे ? यांना तुरुंगांत धाडणार तुम्ही ?

**बाबू०**–अर्थात्,

**मालती**–नको—असे भिंडनडे नकोत व्हायला—अहो, मी सारं सांगतें तुम्हांला.

**अर०**–( हलक्या स्वरांत ) तूं जरा गप बसतील तर ठीक होईल. ( फौजदार व आजोबा येतात. )

**आजोबा**–[ हा सूर्य व हा जयद्रथ अशा आविर्भावानें बाबू व अरविंद यांचेकडे पहात ] हें पहा तुमचं सावज फौजदारसाहेब.

**फौजदार**–पाहिलं. या बदमाषाला मी अंधेरांतसुद्धां हुडकून काढीन. त्याचा फोटो आहे आमच्यापाशीं आणि तो पाठ आहे आह्मांला. या लोकांची जन्मखोड जात नाहीं कांहीं केल्या. तुरुंगांत घाला नाहीं तर फाशीं द्या. ( फौजदाराकडे पाठ करून अरविंदाकडे पहात राहिलेल्या बाबूच्या खांद्यावर हात ठेवून ) चला लखोबा—

**बाबू०**–आं ? काय म्हणतां ?

**फौज०**–काय म्हणायचं दुसरं ! मुकाट्यानं चला म्हणतों मी. बाहेर पोलिस उभे आहेत सोबत करायला.

**बाबू०**–बाजूला व्हा. मी नव्हे लखोबा.

**फौज०**–ऐसा ! सीधेपणानं यायचा बेत नाहीं तुमचा ! चांभाराच्या देवाला......याचीच पुजा पाहिजे म्हणायची ?

**आजोबा**–फौजदारसाहेब, चुकतां तुम्ही. भलत्याच माणसाला तुम्ही चोर समजत आहांत. ते अरविंदराव आहेत. आणि हा पहा खरा चोर. [ अरविंदाकडे बोट दाखवितो ]

**फौज०**–माफ करा. माझी चूक झाली. पण अलीकडं असं झालंय, कीं सोदा संभावितासारखा दिसतो आणि संभावित सोद्यासारखा दिसतो. बऽरं, झालं तें झालं.

**बाबू०**–होऊं दे. हा पहा तुमचा आदमी. ( अरविंदाकडे बोट दाखवितो )

**फौज०**–[ अरविंदांच्या दंडाला धरून ] चल रे लख्या.

**मालती**–नाहीं. त्यांनीं कोणताही गुन्हा केलेला नाहीं. आणि तुह्मांला त्यांना पकडतांही येणार नाहीं.

**फौजदार**–तुह्मी कोण ?

**मालती**–मी ? अरविंदांची बायको. या घरची मालकीण.

**बाबू०**–फौजदारसाहेब, माझ्या बायकोचं डोकं आज ठिकाणावर नाहीं.

**मालती**–आतां मला ‘ बायको बायको ’ ह्मणायचं थांबवाल कां जरा ?

**बाबू०**–मग काय? तुला माझा ‘ नवरा ’ ह्मणूं ?

**मालती**– नवरा म्हणा नाहींतर सासरा ह्मणा. इश्श.

**आजोबा**–माले ! तूं जास्त जास्तच आचरटपणा करायला लागलीस ? ज्याची खेटरपुजा करावी त्याचा तूं कैवार घेतस ? वेडी कुठली. तुझ्या लग्नांतले आहेर यानं चोरले ?

**मालती**–मग तो माझा प्रश्न झाला. त्यांत दुसऱ्या कोणी बोलायचं कांहींच कारण नाहीं.

**फौज०**–मालतीबाई, चुकतां आहांत तुह्मी. हा कायद्याचा प्रश्न आहे. तुमची त्याच्याविरुद्ध तक्रार नसली तरी यानं चोरी केली हें स्पष्ट आहे. आणि गुन्हेगार म्हणून याला पकडायचा मला अधिकारही आहे. कोणाविषयीं सहानुभूती बाळगावी याला झालं तरी तारतम्य पाहिजे. अहो ! हा पक्का बेरड आहे.

**मालती**–मुळींच नाहीं. हे बेरड नाहींत रामोशी नाहींत कीं चोरही नाहींत. हे माझे पति आहेत.

**बाबू०**–( दचकतो ) ( अरविंद पेचांत पडल्यासारखा होतो. )

**फौज०**–हें मोठंच कोडं आलं. मालतीबाई ! पांच मिनीटांपूर्वी हे दूसरे गृहस्थ आपले यजमान असं तुह्मी म्हणलांत ?

**मालती**—होय. पण तें खोटं सांगितलं मी. ते माझे यजमान नव्हेत. ती एक थट्टेची गोष्ट होती ते माझे उसने यजमान होते.

**फौज०**—वा ! बाईसाहेब हें तरी तुमचं बोलणं खरं कां ?

**आजोबा**—माले ! शर्थ झाली तुझ्या आचरटपणाची. फौजदारसाहेब, या वेडया मुलीच्या बोलण्याकडं मुळींच लक्ष देऊं नका. हिला केव्हां केव्हां वेडाची लहर येते. हें मला हिच्या लहानपणापासून माहीत आहे. मला वाटलं होतं मोठी झाल्यावर हिची ही खोड जाईल. पण जो गुण बाळा तो जन्मकाळा असं म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं. कांहीं तरी कुलंगडीं करून गळयांत घोंगडं घ्यायची तिला संवयच लागून गेली आहे.

**फौज०**—तें खरं हो. पण या मालकीणीचा खरा मालक कोण, आणि चोरटा लख्या लंगोट्या कोण, हें मी कसं समजूं ? मालतीबाई ! कोणता कोण ? डोकं शाबूत ठेवून सांगा अं !

**मालती**—विचारा त्यांनाच [ बाबूरावाकडे बोट दाखवते ]

**फौज०**—ठीक आहे. तुह्मी या बाईचे यजमान काय ?

**बाबू०**—अर्थात्.

**मालती**—नव्हे. हे माझे यजमान नव्हेत.

**फौज०**—[ अरविंदरावास ] तुह्मी काय सांगतां राव ?

**अर०**—मला या वेळीं कांहींच बोलायचं नाहीं. मी जिन्नस घेतले. एकदां हा गोंधळ तरी संपूं दे.

**मालती**—पण यांनीं ते कां घेतले तें मी सांगते तुम्हांला.

**अर०**—माझा जबाब मला देतां येतो. मेहेरबानी करून तुम्ही मधें मधें बोलूं नका.

**मालती**—[ बाबूस ] तुमच्या पायीं बरं, तुमच्या पायीं हा सारा घोटाळा झाला. तुमची धिंडका इथं आणली कशाला असं झालंय. **( केतकी प्रवेश करते )**

**बाबू०**—लाडके मालती ! असं काय बरं करतेस वेड्यासारखं ? या तुझ्या नवऱ्याची अब्रू...... ( मालती रागानें पाहते व झिडकारते. )

**केतकी**—बाई, बाई, बाई ! काय मेला हा गोंधळ ? बाजार भरलाय जसा कांहीं ! जरा डोळा लागेल तर शपथ. ( तिच्या आवाजासरशीं बाबूराव दचकतो. त्याच्याकडे पाहून ) कोण ? कोण तें ? बाबूराव !

**बाबू०**— कोण ती ? केतकी ? तूं इथं कशी ? चमत्कारच आहे ह्मणायचा ! ( तिचेजवळ जातो. )

**केतकी**—दूर व्हा. तुह्मी तरी इथं कसे ? आणि मालती म्हणजे तुमची लाडकी बायको ?

**बाबू०**—अग तें असं झालं, हें थोडंसं नाटक केलं आम्ही.

**आजोबा**—केतकी, ही काय भानगड ? हे कोण ?

**केतकी**—आजोबा ! हे बाबूराव. ज्यांना मी माझं प्रेम वाहिलं आणि ज्यांच्याशीं लग्न करण्याबद्दल मी तुमची संमती विचारीत होतें तेच हे. असे केसानं गळा कापणारे.

**आजोबा**—छट् ! वेडी कुठली ? हे कसे होतील बाबूराव ? हे मालतीचे प्रेमळ पती अरविंदराव. यांच्याशीं कसं होईल तुझं लग्न ? [ केतकी पदर डोळ्याला लावून रडते ]

**बाबू०**—उगा ! केतकी शांत हो. आपण सारी मंडळी शांत व्हा. सारा उलगडा सहज होण्यासारखा आहे. झाली ही सारी चूक झाली. माझं मुळींच लग्न झालेलं नाहीं.

**केतकी**-तुमचं लग्न झालंच असलं पाहिजे. तुमचा आणि मालतीचा खट्का उडालेला मी पाहिला आहे. तुमचं जर लग्न झालं नाहीं तर खटका उडायचं तरी काय कारण ?

**बाबू०**—आतां काय सांगून उपयोग ? या मालतीबाईंच सारा खुल्लासा

करतील. ( मालतीला ) लाडके मालती, अहं चुकलों मालतीबाई तुम्हीच सांगा खरं काय तें. आपण नवरा बायको आहों काय ?

**मालती**–( उट्टं काढण्याच्या उद्देशानें ओठ चावून ) होय.

**बाबू०**–आँ ? काय ह्मणतां हें ?

**मालती०**–ज्या वेळीं मला सांगायचं होतं त्या वेळीं मला तुह्मीं बोलूं देत नव्हतां. आतां निस्तरा तुमचं तुम्हींच. ( दूर जाऊन कोपऱ्यांतील खुर्चीवर बसते )

**बाबू०**–( रडकुंडीस येऊन ) लाडके केतकी ! हें मुळींच खरं नव्हे. मालतीबाई माझी गंमत पाहण्याकरतां सांगताहेत असं. हा सारा प्रकार थट्टेचा होता. मालतीबाईला मी आजतागाईत पाहिलंसुद्धां नव्हतं. नवरा म्हणून त्यांनीं मला घटकाभर उसना घेतला होता एवढंच काय तें.

**मालती०**–बोला, हवं तितकं खोटं बोला.

**आजोबा**–आलं लक्षांत. या साऱ्याचं मूळ माझ्या जमीन जुमल्यांत आणि सावसावकारींत आहे. बाबूराव ! माझी संपत्ती या दोन मुलींपैकीं कोणाला तरी मिळणार हें पाहून दोघीशींही लग्न लावण्याचा तुमचा डाव दिसतो. बडे कारस्थानी दिसतां ?

**बाबू०**–भलतंच काहीं तरी. तुमच्या संपत्तीची मला मुळींच परवा नाहीं. दुसऱ्याच्या पैशावर दिमाख दाखवणारा हा पठ्ठया नव्हे.

**आजोबा**–मग या पोरींना पैसा न देता तुमच्या मुलालाच पैसा दिल्याबद्दल तुम्हीं माझी खुशामत कां करीत होतां ?

**केतकी**–मुलाला ? आणि मूल झालं काय यांना ? शर्थ झाली ह्मणायची आतां. बाबूराव याउप्पर तुमचं तोंड ही बघायची माझी इच्छा नाहीं.

**बाबू०**–अग पण ऐकून तरी घे.

**केतकी**–कांहीं गरज नाहीं ऐकून घ्यायची. **[ जाते. ]**

**बाबू०**-अग एक मिनीट तरी थांब! आजोबा, तुह्मी तरी घेतां कां ऐकून?

**आजोबा**-ऐकलं इतकं पुष्कळ झालं. ( रागानें प्रहात आंत जातो.)

( त्रासिक चेहरा करून बाबूराव आंत जातो )

**अर०**-( हंसून ) आतां कुणी कसला खुलासा करायचा हेंच कळेनासं झालं आहे. मालतीबाई सांगतात तें ऐकून घ्यायला कोणी तयार नाहीं. मी बोलूं लागलों तर मला बोलूं द्यायची कोणाला इच्छा नाहीं. आणि हे राजेश्री कंठशोष करताहेत तर आजोबा आणि केतकी पळूनच गेलीं.

**फौज०**-मी आजपर्यंत पुष्कळ चोरांची ठिकाणं धुंडाळलीं. मी कित्येक चोरांना पकडलं आणि कित्येक चोरांनीं मला गुंगाराही दिला. पण इथं मी चोराला पकडूं शकत नाहीं, आणि चोरहि मला गुंगारा देत नाहींत. आपली तर अक्कल गुंग झाली बुवा.

**अर०**-हं; फौजदारसाहेब जग हें असं चमत्कारिक आहे.

**फौज०**-आहे बुवा. जें मिळालं आहे त्याच्यावर माणसाचं समाधान होत नाहीं. दुसऱ्याच्या मिळकतीवर डल्ला मारायला पाहिजे ज्याला त्याला. विडी, सिगारेट कांहीं आहे कां इथं? ( अरविंद खिशांतील सिगारेटचें पाकीट काढून त्याच्या हातीं देतो. फौजदार एक सिगारेट पेटवून पाकीट खिशांत घालतो ) सांगायचं तात्पर्य काय? डल्ला मारायची इच्छा असते ज्याला त्याला.

**अर०**-आलं, आलं लक्षांत.

**फौज०**-आतां याच गृहस्थाचं पहा. याला चांगली बायको आहे, छानदार बंगला आहे, पण याचं आहे समाधान? पुन्हां याचा डोळा त्या केतकीवर आहेच. पण मरेनात कां? आह्मांला काय करायचं आहे यांच्या भानगडीशीं? लखोबा तुझी आमची गाठ. चल बाबा. हो पुढं. ( अरविंद उठतो ) मी आहेच मागं.

**अर०**-फौजदारसाहेब, मी लख्या चोर नव्हे, हें सांगितलं तर तुमचा विश्वास बसेल कां?

**फौज०**–नांव काढूं नकोस विश्वासानं. माझा माझ्या बोलण्यावरून विश्वास बसेनासा झाला आतां. चल.

**मालती**–थांबा फौजदारसाहेब. मी तुम्हांला सांगतें—वाटेल त्याची शपथ देऊन सांगतें. हे माझे पति अरविंदरावच आहेत. त्यांची अशी बेअब्रू करूं नका. ( हुंदके देते )

**अर०**–[ तिला जवळ घेऊन ] घाबरूं नको लाडके, हे फौजदारसाहेब सज्जन आहेत. [ तिच्या हनुवटीस हात लावून ] हं ! पूस ते डोळे. आणि माझ्याकडे पाहून एकदां खुदकन् हस–[ आजोबा बाहेर जाण्याच्या वेशांत प्रवेश करतात. ]

**आजोबा**–माले ! ( मालती व अरविंद एकमेकांपासून दूर होतात. ] आतां आलं लक्षांत या चोराला फौजदाराच्या ताब्यांत देतांना तूं कां आड येत होतीस तें.

**मालती**–[ गोंधळून ] पण आजोबा, आतां अशा अपरात्रीं बाहेर कुठं चाललां ?

**आजोबा**—या घराचा मला आतां अगदीं वीट आला आहे. तुझ्या-सारखी शिकली सवरलेली मुलगी पतिव्रताधर्मावर असं पाणी सोडते आणि आचारी पाणक्याशीं किंवा चोराटोराशीं असा धिंगाणा घालते, हें पहायसाठीं या घरांत यायची दुर्बुद्धी मला झाली याचा मला पश्चात्ताप होत आहे.

**मालती**–पण आजोबा, ते आचारी पाणके किंवा चोरटोर नव्हेत.

**आजोबा**–तो कोण आहे याची पंचाईत मी करीत नाहीं. पण तूं कशा प्रकारची बायको आहेस याचा बरिक खासा उलगडा झाला. माले, तूं कुलीन स्त्री म्हणवतेस आणि असं निंद्य आचरण—

**अर०**–पण आजोबा तुम्हांला शंका येते तसा प्रकार खरोखर नाहीं. चार शब्दांत याचा सर्व खुलासा होण्यासारखा आहे.

**आजोबा**–तुम्ही नका मधें तोंड घालूं. [ बाबू प्रवेश करतो ] तुह्मांला काय खुलासा करावयाचा असेल तो यांच्यापाशीं करा. [ बाबूरावास ] पहा अरविंदराव तुमच्या दुष्टपणाचं हें फळ. लग्नाच्या बायकोला लाथाडून दुसऱ्या पोरीना गुंग करण्यांत गुंतलां खरे, पण तुमच्या आयत्या बिळांत नागोबा घुसून बसला.

**बाबू०**–कोणता नागोबा ह्मणतां तुह्मी आजोबा ?

**आजोबा**–( अरविंदाकडे बोट दाखवतो. ) हा, हा, तुमचा आचारी किंवा हा घरफोड्या. तुमच्या या बायकोला मिठी मारतो ! सांगावांगीची गोष्ट नव्हे. प्रत्यक्ष या डोळ्यांनीं हा प्रकार पाहिलेला आहे. घ्या आतां काय करून घ्यायचं असेल तें.

**बाबू०**–[ एकदम अंगावर धांवून ] जनोबा ! लब्या ! खरं कां हें ?

**अर०**–अगदींच कांहीं खोटं नाहीं.

**बाबू०**–( थंडावून ) तूं असं करायला नको होतंस. मला असं बेताल वर्तन आवडत नाहीं. तुला आह्मी कामाला ठेवला तो घरकाम करायसाठीं. असलं काम करण्यासाठीं नव्हे !

**आजोबा**–अशा अपराधाला एवढीच कां शिक्षा ?

**बाबू०**–याहून मला काय करतां येणार ? मी याला हाकलून लावला तर हा परत येतो ! याची तुरुंगांत रवानगी करावी ह्मटलं तर हे फौजदार त्याला नेत नाहींत ! अशा माणसांशीं गांठ पडली असती तर तुह्मी तरी काय केलं असतंत आजोबा ?

**अरविंद**–मला वाटतं आजोबा हे करट आतां पुरं पिकलं. आतां तें फोडायला योग्य वेळ आहे. मधांपासून माजलेला हा ब्रम्हघोटाळा उलगडून मोकळं झालंच पाहिजे.

**केतकी**–[ प्रवेश करून ] झाली माझी तयारी आजोबा.

**बाबू०**–केतकी ! [ जवळ जातो ]

**केतकी**–आपली धिंडका आहेच कां इथ? दुसऱ्या पोरांबाळीं नाहींत कां कोणी, त्यांच्याभोवतीं पिंगा घालायला? चालते व्हा माझ्यापासून. [ रागानें जाऊं लागते. ]

**बाबू०**—तुझी समजूत पटेपर्यंत मी तुझी पाठ सोडणार नाहीं! ( तिच्या मागोमाग जातो. )

**अर०**–आजोबा, हें पहा—

**आजोबा**–हें पहा, पुन्हां एकदां बजावतों तुला, आचारी पाणक्यांनीं मालक बोलत असतां मधें तोंड घालूं नये. मला ती गोष्ट बिलकूल पसंत नाहीं.

**अर०**—पण मी आचारी नव्हे. मी अरविंद क्षीरसागर, आपल्या नातीचा नवरा.

**आजोबा**–[ मोठमोठ्यानें हंसून ) अखेर खरं सांगायची बुद्धी झाली म्हणायची! वेळ आली ह्मणजे सारीं सोंगं लटपटतात तीं अशीं, अरविंद-राव. [ पुन्हा मोठ्यानें हंसतो. ]

**मालती**–ह्मणजे आजोबा? यांना आधींच ओळखलं तुम्हीं?

**आजोबा**–वेडे पोरी! मी म्हातारा असलों तरी माझे डोळे पक्के शाबूत आहेत. मी यांना ओळखल्याशिवाय कसा राहीन? लग्न झाल्याबरोबर तूं दोघांचा फोटो मला पाठविलेला विसरलीस होय? अग, यांनाच काय, पण डॉ. बाबूरावांनासुद्धां ओळखलं मी. त्यांच्या फोटोनीं केतकीची खोली मढवलेली आहे नुसती. पैशाएवढ्या फोटोपासून परातीएवढ्या फोटो-पर्यंत शेंकडों प्रकार भरले आहेत तिथं.

**मालती**—मग केतकीला कां नाहीं सांगितलंत तसं?

**आजोबा**–काय म्हणून सांगीन मी? मी म्हटलं सारेजण मौज करताहेत तर आपणही करावी. डॉक्टरासारखीं शाहाणीं माणसं जाळ्यांत कशीं अडकतात आणि त्यांतून निसटतांना त्यांची कशी तिरपीट उडते हें पाहणं मौजेचं नाहीं काय?

**मालती**—[ उसन्या रागानें ] बरं आहे हं आजोबा ! तुम्हांला सारं ठाऊक असून तुह्मी माझं इतकं हें केलंत—

**आजोबा**—देवाची शपथ माले, मला सारं ठाऊक नाहीं. मला चकव-ण्यासाठीं तूं आपल्या अकलेचं असं प्रदर्शन कां करावंस हेंच अजून डोक्यांत आलं नाहीं माझ्या.

**मालती**—तुमच्यापेक्षां मला खरं चकवायचं होतं त्या लिलीला. ती दर पत्रांत आपल्या श्रीमंतीची ऐट दाखवायची. तेव्हां मी ह्मटलं कीं आपण तिच्या सवाई श्रीमंत आहों असं दाखवावं तिला.

**आजोबा**—लिलीनं तुला श्रीमंतीची ऐट दाखविली ? काय दाखविली ऐट ? काय मोठ्या हवेलींत रहाते म्हणून लिहीलं तिनं ?

**मालती**—होय, आणि आपली सुंदर मोटारगाडी आहे असंही लिहिलं होतं तिनं मला. कां ?

**आजोबा**—अग, पक्की थापाडी आहे ती. रंगरावानं साऱ्या संपत्तीची धूळदाण केली अन् आज अन्नान्न दशा झाली आहे नवराबायकोची. बरं झालं तूं त्याची बायको नाहीं झालीस. माले, लिलीला दिलेल्या थापा खऱ्या भासवण्यासाठीं तूं हें सारं नाटक केलंस होय ? मला वाटलं माझ्या पैशाच्या लोभानं......

**मालती**—मी खोटं कशाला बोलूं आजोबा ? मला तुमच्या पैशाची हाव वाटली, पण ती माझ्या स्वतःसाठीं नसून माझ्या बाळासाठीं.

[ सरला व शिदू येतात. एक टोपली शिदूच्या हातीं असते. ]

**सरला**—मालती, काय जंमत मला सापडली, पाहिलीस कां ?

**मालती**—काय ग ?

**सरला**—बघ म्हणजे कळेल. [ शिदू टोपली ठेवतो. टोपलींत मालती पाहते. )

**मालती**–बाळ ! बाळ ! माझा बाळ ! अरविंद, आपला बाळ ! अग, पण तूं त्याला नेलास तरी कधीं अन् कसा ?

**सरला**–अग, या अरविंदांनीं कपड्याची म्हणून बाळाची टोपलीच दिली माझ्या हातांत. अन् मीहि नेली अंधारांत. पण काय ग मालती, मुलं टोपलींत निजवायची तुझी रीत मुलखावेगळीच बाई !

**शिदू**–त्ये असं झालं, पाळण्यांत अंथरून घालीपर्यंत स्वारी शिरली टोपलींत आणि भाइर येतां येईना. वरडाया लागली. तवा म्हटलं नग पाळणा तर नग. घातलीं दोन दुपटीं टोपलींतच अन् निजिवलं झालं.

**फौज०**–नवऱ्याची जागा बदलली तशी मुलाचीहि बदलली. बिघडलं नाहीं फारसं—

**आजोबा**–अजून झोपच चालली आहे गुलामाची ! ( मालती व सरला टोपलीभोंवती कुजबुज सुरु करतात. )

**अर०**–आतां मेहेरबानी करून त्याला नका उठवूं. त्याच्या बाज्यावाचूनच आमचा खूप बाजा वाजला आज.

**शिदू**–बराबर !

**फौज०**–मग माझं कांहींच काम नाहीं आतां इथं म्हणायचं ?

**अर०**–नाहींच म्हणायचं. ( नोट देतो ) आपल्याला थोडी तसदी पडली, माफ करा.

**फौज०**–( नोट खिशांत घालीत ) आपण खरे सज्जन आहांत अरविंदराव. एवंच काय, ज्याला त्याला डल्ला मारायला पाहिजे दुसऱ्याच्या पैशावर ! [ जातो. ]

**अर०**–मालती, सारं नाटक आनंदपर्यवसायी झालं. आतां केतकीताई आणि डॉ. बाबूराव यांचं तेवढं जमलं—

**आजोबा**–अहो, तें इतकं छान जमलं आहे कीं ज्याचं नांव तें. तुम्ही नका आतां काळजी करूं. ( बाबूराव व केतकी हातांत हात घालून हंसत

येतात. ) हें पहा !

**मालती**–[ केतकीजवळ जाऊन ] बरं आहे ना ग डोकं आतां ? [ हंसते ] डॉक्टर भेटले तुझ्या मत्तचे, तेव्हां औषधाच्या गुणाला काय अवकाश ?

**केतकी**–इश्श ! करा बाई थट्टा !

**आजोबा**–बरं झालं, माझा बडोद्याचा हेलपाटा वाचला. अरविंदराव, आतां येवढे कागद जपून ठेवा. जी काहीं काळजी घ्यायची ती याची घ्या.

**अर०**–आजोबा, तुमच्या या प्रसादानं बाळाचं जन्माचं कल्याण होईल.

**आजोबा**–तुम्हा सर्वांचंच ईश्वरकृपेनं कल्याण होवो !

